


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

चित्रकार दीनानाथ दलाल ह्यांनी सन १९४७ ते १९७१ दरम्यान प्रसिद्ध केलेल्या दीपावली ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीय स्वरूपात जतन करण्याबाबतचा प्रस्ताव चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे राज्य मराठी विकास संस्थेस प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावानुसार दुर्मिळ मराठी ग्रंथांचे संगणकीकरण ह्या प्रकल्पांतर्गत दीपावली नियतकालिकांचे अंक संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सहमती दर्शविण्यात आली.

चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला ही सामग्री संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.










अनुक्रमणिका

अनुक्रमणिका










श्रेयनामावलि–




दलाल आर्ट स्टुडिओ. ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४

टे. नं. ७७७६५

Gram : DALALART

* संपादक-मुद्रक-प्रकाशक-मालक-श्री. दीनानाथ दलाल, दलाल आर्ट स्टुडिओ, ४०–४२, केनेडी ब्रीज, मुंबई ४. या प्रतीस किंमत . १ रु.+ रजि. पोस्ट ५५ न. पैसे. वार्षिक वर्गणी दिवाळी अंकासह रु. १२॥. अंकांत प्रसिद्ध झालेली मतें ही चालकांचीहि अधिकृत मतें असतातच असें नाहीं.






अनुक्रमणिका




**दलाल आर्ट स्टूडिओ**

४२, केनेडी ब्रीज, मुंबई ४,

टेलिफोन : ७७७६५ ★ तारेचा पत्ता : DALALART

● **वर्गणीदारांस सूचना** : दीपावली व सर्व खास अंकांसह दीपावलीची वार्षिक वर्गणी रु. १२–५० न. पै., द्वैवार्षिक वर्गणी रु. २०; त्रैवार्षिक वर्गणी रु. २५ व चार वर्षांची वर्गणी रु. ३२. **परदेशी वार्षिक वर्गणी रु. १६–००**

● **वर्गणी** मनिऑर्डरनें यावी. चेक पाठविल्यास तो दलाल आर्ट स्टूडिओच्या नांवें, मुंबई बँकेवरचा असावा. इतर ठिकाणच्या बँकेवरचा असल्यास ७५ न. पै. वटणावळ जादा पाठवावी. कोणत्याहि महिन्यापासून वर्गणीदार होतां येतें.

● **अंक न पोचल्याचें** कळवावयाचें झाल्यास ५ तारखेपर्यंत वाट पाहून मग कळवावें. अंक ऑफिसमध्यें शिल्लक असल्यास जरूर पाठविला जाईल.

● **जाहिरातींचा व्यवहार** हा परस्पर विश्वासाचा असतो. गिऱ्हाइकांच्या इच्छेनुसार जाहिरात छापण्याची कोशिस करण्यांत येते. तरीहि तांत्रिक अडचणीमुळें अगर अन्य कारणामुळें जाहिरातींत कमी-जास्त फरक झाला तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकांवर नाहीं.

● **साहित्याच्या स्वीकृतीचा** निर्णय महिनाभरांत सामान्यत: कळविला जातो. **पोस्टेज असलेलें** नापसंत साहित्य परत पाठविलें जातें. पुरेसें पोस्टेज नसल्यास तें निकालांत काढलें जाईल.

● **स्वीकृत अगर इतर साहित्य** गहाळ झालें तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकांवर नाहीं.

संपादक, मालक, मुद्रक व प्रकाशक श्री. **दीनानाथ दलाल** यांनीं स्टेट्स पीपल प्रेस, जन्मभूमि भवन, घोगा स्ट्रीट, फोर्ट, मुंबई १ येथें छापून, दलाल आर्ट स्टुडिओ, ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४ येथें प्रसिद्ध केलें.

## संपादकीय

# 'उन्हाळ्यां'त नवा प्रवेश !

विसाव्या वर्षाचा हा पहिला अंक रसिक आणि चोखंदळ वाचकांच्या हातीं हंसत हंसत आणि दगदगींतून दोन क्षण बाजूला जाऊन हंसविण्याकरितां प्रतिज्ञापूर्वक– देत आहोंत. सध्याचें जग हें जसें आत्मस्तुतीचें तसेंच परनिंदेचेंहि आहे; (देशांतील सारे सत्तारूढ पक्ष– कॉंग्रेस कम्युनिस्ट, सोशालिस्ट, स्वतंत्र आदि आत्मस्तुति आणि परनिंदा करण्यांत गर्क आहेत) परंतु दीपावलीच्या वाढ दिवसाच्या या मंगल प्रसंगीं परनिंदा तेवढी बाजूला ठेवून माफक प्रमाणांतली आत्मस्तुति वाचकांच्या कानावर घालणें हें आम्ही आज कर्तव्य समजतों. आणि त्याच गोष्टीला आतां हात घालतों.

वीस वर्षांपूर्वीं आम्हीं दीपावली हें वार्षिक सुरुं केलें. त्यावेळीं आतांच्या सारखीं वार्षिकें किंवा मासिकें – 'गवता ऐसी – उदंड जाहलीं' नव्हती. कांहीं निष्ठा होत्या, मर्यादा होत्या, बंधनें होतीं, तीं पाळून जेवढें कांहीं-नवें करतां येईल तेवढें आम्हीं केलें. गृहस्थांघरीं आमच्या या उपक्रमाचें अमाप कौतुक झालें; हा इतक्या वर्षांतला आनंद नंबर १, थोडयाच अवधींत आमच्या वार्षिकाची नक्कल झाली हा आनंद नं. २, आधीं आम्हीं करावें आणि लगेच त्याची री अन्यांकडून ओढली जावी असें सर्रास घडूं लागलें हा आनंद नं. ३, दीपावलींतून प्रसिद्ध झालेल्या कथा त्या त्या वर्षांतल्या सर्वोत्कृष्ट कथा ठरून त्यांना अग्रक्रम मिळाला हा आनंद नं. ४ आणि थोडीं थोडकीं नव्हे– वीस वर्षें, वीस उन्हाळें, वीस पावसाळें व वीस हिवाळें यशस्वी वाटचाल करून एकविसाव्या उन्हाळ्यांत प्रवेश करीत आहोंत हा सर्वांत मोठा आनंद. आतां गेल्या वर्षी काय घडलें याची थोडीशी बढाई मारणें इष्ट आहे.

मराठींतील प्रथितयश लेखक सर्वश्री पु. भा. भावे, पु. ल. देशपांडे, अरविंद गोखले, अच्युत बर्वे, वामन चोरघडे, श्रीराम कामत, शां. शं. रेगे, चित्रकार गोडसे, रणजित देसाई या सर्वांनीं दीपावलीवरच्या गेल्या वीस वर्षांतील प्रेमांत भर घालून आपलें अत्युत्कृष्ट साहित्य दीपावलीला देऊन ऋणादन करून ठेवलेलें आहे. सौ. शिरीष पै यांची गंत्रकथा, 'खडक चांफा' या वर्षीच्या कथासाहित्यांतील 'मैलाचा दगड' ठरली. दुसरा उल्लेखनीय विशेष म्हणजे श्रीराम कामत यांची 'भीष्माचा डोंगर' ही कादंबरी. अनेकांनी तिचें हर्षानें स्वागत केलें. नव्या दमाचे प्रभाकर नेरूरकर, पद्माकर गोवईकर, दमयंती सरपटवार, कै. इंदु साक्रीकर, मनोहर प्रभृति लेखकांच्या एकाहून एक सरस कथा दीपावलींतून प्रसिद्ध झालेल्या आहेत; व त्या गाजलेल्या आहेत.

ललित साहित्यावरोबरच सांस्कृतिक प्रचाराच्या बाबतींत आम्हीं नेहमींच आघाडीवर राहिलेलें आहोंत. या बाबतींत श्री. आनंद साधले, डॉ. सरोजिनी बाबर, भा. श्री. परांजपे, अशोक अकलूजकर, चित्रकार भय्यासाहेब ओंकार या लेखकांनी मोलाची भर घातली. जयवंत दळवी, वसंत सबनीस, बाळ सामंत, विजय तेंडुलकर या विनोदी साहित्य प्रांतांतल्या आघाडीवरील सेनानींनी जें मोलाचें सहाय्य केलें त्याचें या आनंदाच्या प्रसंगीं स्मरण होतें. चांगला दर्जेदार विनोद देण्यांत दीपावली नेहेमींच आघाडीवर राहिलेली आहे. या अंकांत वाचकाला त्याचें प्रत्यंतर येईलच. गेला अंक आम्हीं खास क्रीडा विषयाला वाहिला आणि निराळेपणामुळें त्याचें स्वागतहि उत्तम झालें.

आधीं करायचें आणि नंतर सांगायचें यावरच दीपावलीचा विश्वास असल्यामुळें जें आधीं केलें तेवढेंच अगदीं माफक प्रमाणांत सांगितलेलें आहे. यापुढें काय करूं हें या ठिकाणीं सांगत नाहीं. जें करूं तें नाविन्यानें भरलेलें असेल. रसिक वाचकांची तृप्ति होईल असेंच असेल. वाचकांचा आमच्यावर लोभ आहेच त्यांत वृद्धि व्हावी हीच या प्रसंगीं विनंति.

—संपादक











अनुक्रमणिका

## • सर्वाहून वरचढ •

स. न. वि. वि,

आपल्या मासिकाचा फेब्रुवारी ६४ चा क्रिकेट पुरवणी अंक अत्यंत आवडला. मुखपृष्ठ तर चांगलें आहेच. पण साहित्यहि फार चांगले आहे. क्रिकेटच्याच निमित्तानें अनेक मासिकांनीं पुरवणी काढली त्यांत गुजराती व हिंदी मासिके अपवाद नाहींत. मी तें वाचलें व पाहिलें आहेत. पण आपल्या अंकाची आकर्षकता विशेष आहे. वारकरीचा 'ते चौरंगी दिवस' आणि मधुकर कोसारे यांचा 'गनिमी पावित्र्याचा जेसप' हे दोन लेख जुन्या क्रिकेट खेळाची खऱ्या अर्थानें ओळख करून देतात. एका परीनें आपण चांगली युति साधली आहे—भारतीय व इंग्लंडच्या जुन्या खेळाडूंचा परिचय करून देण्याची. श्री. क्रिडाप्रेमी यांनी भारतीय खेळाडूंचा परिचय मार्मिक पणें व कांहींसा खोचक बोचक पण यथार्थ केला आहे. तिरंदाजचें कांहीं विचार ग्राह्य आहेत तर कांहीं अग्राह्य आहेत, पण मी त्यांच्याशी असहमतहि नाहीं. कराडकरांनी उडविलेला अंपायरचा त्रिफळाहि रोचक आहे. सजावट, लेख, साहित्य, ठेवण फार आवडली. विनोद अंकाकडे लक्ष लागले आहे. मनःपूर्वक धन्यवाद !

आपला

**बळीराम पवार**
चंदनवाडी, मुंबई २.

## • हुरहूर

स. न. वि. वि.

'दीपावली'चा फेब्रुवारी ६४ चा अंक फार आवडला. 'हे असे आहेत भारतीय खेळाडू' हा क्रिडाप्रेमी यांचा लेख नेहमीपेक्षां वेगळा आणि म्हणून फार आकर्षक वाटला. हा लेख एम. सी. सी. चा दौरा सुरु होण्यापूर्वी प्रसिद्ध झाला असता तर तें जास्त समयोचित ठरलें असते. 'कराडकर' यांचा 'अंपायरचा त्रिफळा' हा विचाऱ्या अंपायरविषयीं लिहिलेला लेख पण बरा वाटला.

'अरविंद गोखले' यांच्या कथेची उणीव खटकली. क. लो. अ. ही विनंती.

आपला

**कमलाकर परांजपे**
रांची (विहार)




## • नवा पायंडा

स. न. वि. वि.

आपला क्रिकेट पुरवणीचा फेब्रुवारी अंक बघितला. चाळला प्रथम आणि नंतर विकतच घ्यावासा वाटला. इतका चांगला आहे तो. एकदम् संग्राह्य.

क्रिकेट अंकाची ठराविक चाकोरी व ठोकळवाजपणा सोडून आपण यंदा जी पुरवणीची आणि त्यांतल्या लेखांची नवी प्रथा पाडलीत यावद्दल आपल्या कल्पकतेचे जेवढें अभिनंदन व कौतुक करावे तेवढें अपुरेंच.

यांतला नव्या पद्धतीने करून दिलेला भारतीय खेळाडूंचा लेख तर सर्वोत्तम आहे. लेखकाचे नांव कृपया जाहीर करावें. ते पंडीत (वाळ ज-तर) नव्हेत ? त्यांतले प्रत्येक खेळाडूबद्दल लिहिलेलें अक्षरन् अक्षर खरें आहे व ते आजच्या टेस्टमध्यें बरोबर ठरलेले आहे. कुणीहि लेखक असो त्याचे या लेखाबद्दल अभिनंदन.

मी कप्तान होतो हा विनोदी व उपहासगर्भ लेखहि वाचनीय आहे. पंडितांची विनोदीबुद्धी बघून त्यांची भाषा टीकात्मक लेखाप्रमाणेंच या ललित लेखांतहि सारख्याच कौशल्यानें रमते हे दिसून आले.

क्रिकेट बंद करा हा लेख सुद्धां वाचण्या पूर्वी राग आणणारा वाटला, तरी त्यांतले मुद्दे पटण्यासारखेच आहेत हे वाचल्यावर पटते.

कोंड्याची कल्पना उत्कृष्ट आहे. पण उत्तर पाठवण्याची तारीख वाढवावी. वारकऱ्यांनी लिहिलेला लेखहि अंकाचे सौंदर्य वाढवणाराच आहे. तो म. वि. राजाध्यक्षांनी तर लिहिला नाही ? या लेखाचेहि खरे लेखक कोण हे ओळखण्याचें कोडे ठेवायला पाहिजे होतें. एकूण कल्पना प्रशंसनीय वाटतें.

आपला

**यशवंत देव**
शुक्रवार पेठ, पुणें २.

## • डोळ्यांत घातलेलें अंजन

स. न. वि. वि.

आपला फेब्रुवारीचा 'क्रिकेट पुरवणीचा' अंक वाचला. या अंकांत क्रिकेट बोर्डावर व निवड समितीवर कोरडे ओढले त्या बद्दल मी आपलें अभिनंदन करतो. महाराष्ट्रांत क्रिडा विषयाला वाहिलेलीं मासिकें व साप्ताहिकें आहेत. त्यांनी या क्रिकेट दौऱ्याविषयी माहिती दिलेली आहे. परंतु कोणत्याच साप्ताहिकानें किंवा मासिकानें निवड समितीवर आपल्यासारखें कोरडे ओढले नाही. आपण हा अंक काढून क्रिकेट प्रेमी लोकांच्या डोळ्यांत चांगलेच अंजन घातले आहे.

या पुढेहि आपण अशा प्रकारचे साहित्य वारंवार प्रसिद्ध कराल अशी आशा आहे.

आपला विश्वासू,

**म. म. म्हमाने**
अंबोली, अंधेरी, मुंबई ५८



दिल्लीचा क्रिकेट रसिक !

*आमच्या हिच्या दूरच्या नातेवाईकाचे होते लग्न. 'मंगल पत्रिका' आली म्हणून गेलो आम्ही सर्व सहकुटुंब सह-परिवारे....सर्वसाधारण कुटुंबें जातात तशी....पण झाले*

*काय....?*
*एकेक असतात*
*ही लेकांची*
*टारगट पोरं....*
*नाहींतर काय....?*




**लग्न–कार्याला** मंगल कार्य कां म्हटलें जातें आणि तें कार्य जेथें पार पडतें त्या सभागृहाला मंगल कार्यालय कां म्हणतात याचा मला अद्याप पत्ता लागलेला नाहीं. माझें लग्न झालेलें आहे. बऱ्याच वर्षांपूर्वी तें झालें आहे. त्यावेळीं मला हा प्रश्न पडला नव्हता. कांहीं प्रश्न मुळीं उशिराच डोक्यांत येतात. पण आतां मात्र असें वाटतें कीं त्याच वेळीं माझ्या डोक्यांत हा प्रश्न आला असता तर कदाचित मी तें मंगल कार्य मंगल न म्हणता गुपचूप उरकून घेतलें असतें. पण आपले लोकं सुद्धां असे चमत्कारिक असतात कीं लग्नकार्य गुपचूप उरकलें तरी "कांहीं तरी (म्हणजे अमंगल!) असलें पाहिजे! नाहीं तर असें गुपचूप उरकण्याचें कारण काय?" असें बोलायलाहि कमी करत नाहींत.

बरें, हें मंगल कार्य आहे असें समजून तें मंगल कार्यालयांत जाहीरपणें पार पाडावें तरी लोक त्याचा विनोदच करतात त्यामुळें लग्न करण्यास सज्ज झालेल्या वधु-वरांस आतां काय करावें हा प्रश्न पडावा. सुदैवानें त्यांना तसा तो पडत नाहीं म्हणून बरें! नाहीं तर जिकडे तिकडे रामदासस्वामीच दिसले असते.

आतां हेंच पहा – गेल्या आठवड्यांत राजारामपंत भांडारकरांकडून आम्हाला लग्नाचें आमंत्रण आलें. हे राजारामपंत कोण म्हणाल तर तें मला हमखास सांगतां येईल असें मुळींच नाहीं. सर्व साधारणपणें ते आमच्या सौभाग्यवतीचे दूरचे मामा आहेत एवढें खरें! म्हणजे तिच्या आईच्या आतेभावाचा . . . असो! तूर्त ते आमच्या हिचे दूरचे मामा आहेत एवढें लक्षांत राहिलें तरी खूप झालें. त्यांच्या मुलाचें लग्न होतें. त्यांचा मुलगा म्हणजे माझ्या बायकोचा दुरचा मामेभाऊ! (दूरचा मामेभाऊ हें आपलें उगीचच म्हणायचें! लग्नाच्या वेळीं तें मंगल-कार्य असतें म्हणून सगळेच खूप जवळचे होतात!) या तिच्या मामांनीं आमच्या लग्नाच्या वेळीं आम्हालाच एकदां मामा केलें होते. त्यांना कुणी तरी कधीं काळीं (म्हणजे मंगल-कार्यांतच) भेट म्हणून दिलेली स्टेनलेस स्टीलची वाटी त्यांनीं आमच्या लग्नाच्या वेळीं आमच्या हिला भेट म्हणून दिली होती. ती वाटी त्यांना मिळाली तेव्हां त्या मूर्ख दात्यानें 'राजारामपंत भांडारकर यांस' एवढींच अक्षरें त्यावर कोरलली होतीं त्या भाषेंतील अस्पष्टतेचा फायदा राजारामपंतांनीं घेतला. त्यानीं त्याच वाटीवरील भाषा सोयीस्करपणें बदलली आणि 'राजारामपंत भांडारकर यांसकडून' ती वाटी आमच्या सौभाग्यवतीला भेट मिळाली. हें बेमालूम भाषान्तर एरव्ही आम्हास कळलें नसतें. पण "चंपूचें लग्न फुकटांत निभावलें" अशा भाषेंत राजारामपंतांच्या बायकोनें जे सुटकेचे सुस्कारे चार ठिकाणीं सोडले ते कालान्तरानें चंपूच्या (म्हणजे आमच्या हिच्या) कानावर आले. त्यावेळीं 'माहेरचीं माणसें ही अशींच!' अशा आशयाची आम्ही केलेली उघड टीका तिनें मूग गिळून ऐकली होती. पण तो प्रसंग अखेरचाच! त्यानंतर जन्मभर मूग गिळून बसण्याची पाळी आमच्यावरच आली. तदनंतर त्या वाटीवरून राजारामपंतांचें नांव कायमचें पुसून ती वाटी पुनः मंगल-कार्याचा मोका साधून पुनः राजारामपंतांच्या घरांत घुसवण्याचे प्रयत्न मी केले होतेः पण चंपूनेंच त्यांत मोडता घातला. 'आपल्या नांवाला तें शोभत नाहीं!' अशी तिनें उच्च पातळीची भूमिका घेतली. आम्हीहि म्हटलें,





अनुक्रमणिका

जाऊं दे ! निदान या निमित्तानें तरी आम्हाला नांव आहे हें तिच्या तोंडून ऐकतां आलें. असो !

सांगण्याचा मुद्दा एवढाच कीं, राजाराम-पंतांचे वाटीभर उपकार आमच्यावर होते. वास्तविक ते उपकार आम्ही आमच्या डोक्यावर घेण्याचें कांहीं कारण नव्हतें. कारण ती वाटी आमच्या सासरेबुवाकडेच जायची. पण आमच्या सासरेबुवानीं चंपूला आलेले सगळे अहेर आपल्याकडेच ठेवून ही वाटी तेवढी (तिच्यावरील लाल कागदासह) आमच्याकडे पाठवून दिली होती. म्हणजे मुलीला आलेल्या अहेरापैकीं कांहीं अहेर मुलीला परत दिला असें म्हणायला ते मोकळे ! असो. त्यामुळें राजारामपंतांचे वाटीभर उपकार आमच्या डोक्यावर होतेच. (आणि योगायोग असा कीं खोबरेल तेलासाठीं ती वाटी आम्ही वापरत असल्यामुळें--) अक्षरशः वाटीभर उपकार आमच्या डोक्यावर होते.

त्यामुळें आम्हाला लग्नाचें आमंत्रण देऊन उपकाराची परतफेड करण्याची संधि त्यानीं आम्हाला दिली तर त्यांत कांहीं नवल नव्हतें.

राजारामपंत मोठ्या खुषीनें हंसत आमच्या घरीं आले. मंगलकार्याचें हें एक आणखी खास लक्षण आहे. इतर अनेक प्रकारच्या खोटेपणाबरोबर खोटें हास्यहि अशा वेळीं मोठ्या प्रमाणावर दिसून येतें. त्यामुळें ते हंसत घरीं आले. त्यांच्या तोंडावर आसुरी हास्य दिसणें स्वाभाविक होतें. पण आम्हाला मात्र कसलेंहि कारण नसतांना हंसावें लागत होतें.

त्यानीं आमंत्रण-पत्रिका आमच्या हातीं दिली. तिच्यावरील गणपतीच्या चित्राखालीं 'मंगल कार्य' अशीं ठळक अक्षरें छापलेलीं होतीं. म्हणजे आप्तेष्टांच्या मनांत आणखी किन्तु नको ! 'कार्य सिद्धिस नेण्यास श्रीसमर्थ आहे !' अशी ताकिद त्यांत होती. तरीहि वधु-वरांस आशीर्वाद देण्यासाठीं आपण सहकुटुंब सहपरिवार अगत्यानें यावें अशी प्रार्थना होती. कृपा करून अहेर आणूं नये' असें वाक्य त्यांत नव्हतें हें जसें सांगण्याची आवश्यकता नाहीं तसेंच आशीर्वाद म्हणजे अहेर हें समीकरण त्यांना अभिप्रेत होतें हेंहि सांग-ण्याची आवश्यकता नाहीं.

" बरं कां चंपू, आणि तुम्ही जावईबापू ! सकाळपासून आलं पाहिजे. जेवायला राहिलं पाहिजे. नाहींतर नुसत्या अक्षता टाकून पळाल "

इथें मीच मोठ्यानें हंसलों म्हणून राजारामपंत क्षणभर विसावले. 'नुसत्या अक्षता टाकून पळाल आम्ही खूप पळूं ! अहेर टाकल्याशिवाय तुम्ही थोडेच पळूं देणार आहांत ? या विचारानें मी हंसलों. पण क्षणभरानें पुनः गंभीर झालों. कारण प्रसंग तसा कांहीं हंसण्याचा नव्हता.

" पुनः पुनः सांगतो, कार्य आपलं घरचंच आहे. तुम्ही जरी मला दूरचा मामा मानत असला तरी मी मानत नाहीं. तुमचा दोघांचा लग्नानंतरचा फोटो आमच्या घरीं आहे ! अर्थात या सगळ्या गोष्टी मानण्यावर अवलंबून आहेत !

कमरेवर लटकावलेल्या समशेरीला हात घालत "मामा, मामा, तोंड आवरा--!" असें मला ओरडावेसें वाटलें. पण मी ओरडलों नाहीं ! (कमरेलाहि समशेर नव्हतीच !)

येथें आपला विरोध नसेल तर एक जुनी आठवण सांगतो. ती सुद्धां थंड रहावत नाहीं म्हणून ! आमचें लग्न झालें त्यानंतरची गोष्ट ! शुभ मंगल सावधान ! या भटाब्राह्मणाच्या ललकारींत खरोखरच खूप गुप्त अर्थ असावा. पण त्यांतला अर्थ ध्यानीं न घेतां आम्ही फोटो काढला. तोहि या सर्व हितचिंतकांच्या आग्रहास्तव ! सुरवातीला आम्हाला वाटलें, हीं माणसें आमचें कौतुक करीत आहेत म्हणून ! पण पुढें फोटोच्या प्रतीना (फ्रेमसह) झपाट्यानें मागणी आली तेव्हांच माझी या सर्व नातेवाईक मंडळीशीं खरी ओळख झाली. (मला नातेवाईक हा शब्द सुद्धां तऱ्हेवाईक वाटतो !) माझें शें दीडशें रुपये या नातेवाईकांना फ्रेमसह फोटो देण्यांत चटणीसारखे गेले. हिच्या अनेक मामा-काकांच्या घरीं आम्ही वांकड्या मानेनें गेलीं कित्येक वर्षे टांगलों गेलों आहोंत. त्यांच्या भिंतींचीं भगदाडें लपलीं खरीं. पण तीं आमच्या खिशाला पडलीं ! त्या फोटोंतल्या माझ्या मिशांवरून सुरू झालेली टिंगल आज भिंतीलाहि चालू आहे. आतां मी मिशा काढल्या. पण टिंगल संपलेली नाहीं. शिका येतात म्हणून चंपूनें मला मिशा काढायला लावल्या असें बोलण्यापर्यंत मजल गेली. त्यामुळें त्या फोटोच्या जुन्या प्रती मागें घेऊन विनमिशांचे नवें फोटो द्यावेत असाहि विचार अनेकदां माझ्या मनांत येतो !

असो ! ही सारी जुनी घाण उकरण्यात आतां अर्थ नाहीं. आपण आपल्याच घरचेंच कार्य समजून लग्नाला गेलेंच पाहिजे एवढें खरें !

बाकी तें दूरचें लग्न आपल्याच घरचें आहे हें मला दुसऱ्या दिवसापासूनच जाणवूं लागलें यांत संशय नाहीं. नाहींतर कोणाचें लग्न ? त्यासाठीं हिला नवीन साडी घेण्याचें कारण काय ? हें आप-ल्याच घरचें लग्न आहे असे हिनें कां समजावें ? इथेंच खाडदिशीं तीस पस्तीस रुपये उडले. तरीहि 'तुम्ही सुद्धां नवीन सूट शिवा !' असा तिचा लकडा होता तो मी कानावर घेतला नाहीं. माझ्या स्वतःच्या मंगलकार्याला शिवलेला कोट मी आयुष्यांतल्या सर्व मंगल कार्यासाठीं राखून ठेवला आहे. त्या मानानें माझी शरीरप्रकृति सांप्रत डबल झाली आहे हें खरें ! पण त्या काळांत कोटाची डबल ब्रेस्टची फॅशन होती ती माझ्या पथ्यावर पडली आहे. तो कोट आतां चालू काळाशीं अनुरूप असा सिंगल ब्रेस्ट झाला आहे. त्या कोटाच्या वरच्या खिशांत मी हात-रूमाल खोवून ठेवतो. कारण आपली बायको साडी, पोलका, चप्पल, दागिने सर्वांना ऐटीनें दाखवत असतांना आपल्याकडे सुद्धां दाखवण्यासारखें कांहीं तरी आहे असा सुप्त (म्हणण्यापेक्षां गुप्त) विचारच आपल्या मनीं असावा !

अशा प्रकारें (म्हणजे सर्वसाधारण कुटुंबें लग्नाला जायला निघतात त्या प्रकारें) आम्ही सहकुटुंब सहपरिवार मंगल कार्याला शोभा आणण्यासाठीं निघालों. वाटेंत कुठें










मिषाली मिरवणूक ?.'' मिरवणुकीवरचा बॅन उठला का ?' 'बोडक्याचें कुटुंबनियोजन !' वगैरे टारगट लोकांच्या तोंडचे अभिप्राय उडत उडत कानावर येत होते. पण ज्यावेळीं आम्हाला ही सात मुलें झालीं त्यावेळीं कुटुंबनियोजनाचें फॅडच अस्तित्वांत नव्हतें हें या नवीन पिढीला कसें समजणार?

बरें, मंगल कार्यालयांत पाय ठेवावा तर सगळी मंडळी बरोबर आली ना ?" (म्हणजे कोणी चुकलेलें नाहीं ना ?) ही चौकशी करण्यास राजारामपंतांची पत्नी दारांत हजर ! मंगलकार्याचें दार हें, कां कोण जाणे, मला कोंडवाड्याच्या दारासारखें वाटतें. कधीं एकदां दार उघडतें आणि आपण बाहेर पडतो अशा बेतानें कोंडवाड्याच्या दारांत जशीं गुरें गोळा होतात तशीं मंगलकार्याच्या दारांत गर्दी असते. कुणी सडलेली पानें देतो, कुणी म्हैसूरी (आणि सुवासिक) सुपारीची पुडी देतो (त्यांतहि सुपारी नांवापुरती आणि कागद गांवापुरता !) कुणी भडक वासाचें अत्तर पालथ्या मुठीवर लावतो. (लावतो म्हणजे काय, एवढेंसे चांदीचें कानकोरणें मनगटावर ओढतो.) कुणी विनवासाचें झेंडूचें फूल देतो. तेवढ्यांत खिशांतला हातरूमाल सुद्धां काढूं न देतां गुलाबपाण्याच्या नांवानें कोणी तरी शॉवरबाथ घडवतो. थोडक्यांत, 'अनंत हस्तें कमलाकरानें देतां किती घेशील दो करानें' अशी परिस्थिति होते.

तेथून चार पावलें पुढें जावें तर मी स्वतः, एक सौभाग्यवती आणि सात मुलें अशा एकूण नऊ जणास मिळालेलीं पानें, सुपारी माझ्या खिशांत कोंबली जातात. माझा खिसा हा कोंबण्यासाठींच आहे असा त्यांचा कां बरें समज व्हावा ? थोडक्यांत, एका क्षणार्धांत माझ्या खिशाला पानाच्या गादीचें स्वरूप येते.

मंगलकार्यालयांत आलेले सारे लोक आपल्याला वेगळे लेखून ऐटबाज़ीनें फिरत असतात. दारांत मिळालेलें झेंडूचें फूल (जणुं कांहीं काश्मीरी गुलाबच समजून) हुंगत सिनेमांतल्या मोंगल बादशाहासारख्या येरझारा घालतात. त्यांतल्या किमान एकाच्या तरी कानाशीं जाऊन 'राजमान्य राजश्री, झेंडूच्या फुलाला वास नसतो !' एवढें एक सत्य कानीं घालावें अशी तीव्र इच्छा होते. पण तें जमत नाहीं.

तेवढ्यांत, चकचकीत बकोट धरून राजारामपंत आम्हाला फराळाला घेऊन जातात. "घ्या, फराळ घ्या !" असें म्हणून ते ताट ओढतात. त्यांत इतरांनीं चिवडलेला चिवडा आणि कडक बुंदीचे लाडू असतात. "अरे, चहाची किटली घ्या रे . . ." असें म्हणत ते गर्दीत ओढले जातात आणि अदृश्य होतात. तेवढ्यांत कुणाचा कुणाला कुणाला तरी धक्का लागून कुणाच्या तरी शालूवर चहा सांडतो. आणि तेवढ्यावरून लग्न मोडतें कीं काय अशी गडबड उडते. पण हें तर चालायचेंच अशा शांत समजुतीनें इतर लोक फराळ करतात. तेवढ्यांत कुणाचें तरी कारटें पोट भरल्यामुळें मूठभर चिवडा अक्षता टाकल्याप्रमाणें माझ्या डोक्यावर टाकतें. डोक्यावर खूपसे केस असते तर चिवड्यांतले पोहे आणि विशेषतः मसाला केसांतून काढणें कठीण झालें असतें. तुळतुळीत टक्कल पडल्याचा याच वेळीं मला प्रथमच आनंद झाला.

मी कांहीं खात नाहीं असें पहातांच पुनः राजारामपंत गर्दीतून पुढें आले. आणि म्हणाले, "वाः वाः ! असे गप्प का ? सुरू करा." तेंच ताट त्यांनीं पुढें ओढलें. चिवडा तेलकट. मला चालत नाहीं. घसा खवखवला असता. कडक बुंदीचे लाडू फोडायचे तर दांताची कवळी मोडून कोण घेणार ? (बेसनाचे किंवा आणि रव्याचे लाडू करायला काय धाड भरली होती ?) त्यामुळें कोल्ह्याच्या घरीं पाहुणचारासाठीं गेलेल्या करकोच्यासारखा मी फक्त उभा राहिलों. त्या फराळासाठीं जमलेल्या गर्दीत एकेकाची चालू असलेली तोंडें पहात आणि गुपचूप आंवडे गिळत मी स्वस्थ उभा राहिलों. त्या गर्दीत माझ्यासारखा आणखी एक करकोचा मान उंच करून उभा होता. केवळ त्याच्या मिटलेल्या तोंडाकडे माझें लक्ष गेलें म्हणून तो हंसला आणि म्हणाला, "कसें काय ? बरें आहे ना ?" या शब्दां-बरोबर त्याच्या दांतांच्या चिपळ्या सुद्धां वाजल्या ! तो कोण होता कोण जाणे ! केवळ मी त्याच्याकडे पाहिलें म्हणूनच त्यानें प्रश्न विचारला.

**लग्नानंतर....!**



**"अरे पण, तूं कसं ओळखलंस माझं लग्न झालंय म्हणून....?"**




आतां प्रत्येक दुकानीं मिळतो





ताजा, स्वादिष्ट,
उत्तम चहा!

# टाटा-फिन्ले

## चहा

*अप्रतिम चहा आहे!*

टाटा-फिन्ले चहा उत्कृष्ट चहा आहे. याची कारणें तशीच आहेत. फिन्ले चहांतले दर्दीच ! जगांतला सर्वोत्कृष्ट चहा त्यांच्याच मळ्यांत पिकतो आणि जगांत सर्वांत अधिक मळे त्यांचेच आहेत. चहामिश्रणाचें तंत्रकौशल्य त्यांना उत्तम अवगत आहे. टाटांना देशांतील बाजारपेठेचा दीर्घानुभव आहे. आपल्यासारख्या ग्राहकांना काय हवे याची त्यांना अचूक कल्पना आहे. या उभयतांनी आतां एकत्र येऊन आपल्याला उत्तम चहामिश्रणें पुरविण्याचें काम हातीं घेतलें आहे. खास पॅकबंद डब्यांतून व पुड्यांतून हा चहा मिळत असल्याने तो नेहमी ताजा, स्वादिष्ट, उत्तम, कडक मिळतो. एकदां वापरून पहा, की आपल्यालाहि याची प्रचीति येईल.

**टाटा-फिन्ले** *चहा प्या,*
*चहाचा खरा आस्वाद घ्या!*








"ठीक आहे !" मीहि चिपळ्या वाजवून दाखवल्या.

भोंवतालचे लोक तर दुष्काळी जिल्ह्यांतून आल्यासारखे खात होते.

जमलेल्या लोकांची ही खा–खा संपणार नाहीं अशा भीतीनें राजारामपंतांच्या वतीनें कांहीं माणसें जमाव पांगवण्यासाठीं धांवून आलीं.

"चला–चला. . .मुहूर्त जवळ आला ...." असें ओरडत त्यांनीं चिमूट चिमूट अक्षता वाटल्या आणि वकरी अड्ड्याच्या दिशेनें मेंढरें वळवावीत तशीं माणसें वळवली.

डाव्या हाताच्या तळव्यावर (रेशनच्या) अक्षता घोळवीत जमाव उभा असतांना भटजींनीं गळ्याच्या शिरा फुगवायला सुरवात केली.

"लक्ष्मी: कौस्तुभ पारिजातकसुरा धन्वन्तरीश्चन्द्रमा: ।"

अरेरे ! मंगलाष्टकें हीं आवाज काढूनच म्हणायला पाहिजेत असें प्रथम कुणीवरें बंधन घातलें असेल ! कारण त्यामुळें ज्यांच्याकडे काढायला चांगला आवाज नाहीं त्यांना तो खरवडून काढावा लागतो ! शिवाय संस्कृतांतलीं जोडाक्षरें ! म्हणजे फुकटचे शेंडीला हिसके आणि समोरच्यांना तुषारस्नान ! आणि तेंहि चक्क घटिका पळें भरेपर्यन्त !

आतां दमलेल्या भटजींना विसावा देऊन कांहीं तरुण मुली आपण लता मंगेशकर आणि आशा भोसले आहोंत अशा वहाणा करतात. त्यांच्याच कुणा तरी नातेवाईकानें (वहुधा मॅट्रिकपर्यंत संस्कृत शिकवणारा मास्तर असावा !) लांब लांब शद्व कोंबून मंगलाष्टक रचलेलें असतें. तें मंगलाष्टक म्हणतां म्हणतां थेट करुणाष्टक होतें. कारण त्यांत कोंबलेलीं लांबलचक नांवें आणि त्यांतलीं जोडाक्षरें यामुळें गाणाऱ्या मुली (त्यांतल्या दोन तरी बोबड्या असाव्यात !) अक्षरश: हैराण होतात. तरीहि त्या समंजसपणें एकमेकांच्या चुकीच्या उच्चारावर आणि आलापावर खुदुखुदु हंसतात ! या मुलींचा हा सांस्कृतिक कार्यक्रम चालू राहिला तर आपणच काढून दिलेला मुहूर्त टळेल आणि (त्या मुलींना काय, फार तर पुन: हंसतील !) गोंधळ होईल अशी भटजींना धास्ती वाटते.

"भांडार करकुलोत्पन्न..." या शेवटल्या दोन जोडाक्षरावर मुली पुन: अडखळल्या आहेत ही संधि पहातांच भिकंभटजींनीं एकदम टाहो फोडला, "सावधान...कुर्यात् सदा मंगलम्..." अशा रीतीनें पोराटोरांचा पोरखेळ थांबवून भिकंभटजींनीं जाणतेपणानें कारभार आपल्या हातीं घेतला. (त्या भटजींचें नांव काय होतें कोण जाणे ! पण गोट्यांमधल्या ढप्पराचें नांव भिकंभटजीच असावें असें मला नेहमींच वाटतें !) आणि हवेंत हाताचा पंजा उडवीत "शुभ मंगल..."करतां करतां चौघड्यावर तडाख्यानें कांठी पडली. सनईवाला झोपला होता. त्यामुळें सनईचे मंगल सूर खूप उशिरा ऐकूं आले. लोकांनीं आतां पर्यंत चिक्कूपणानें (तो कुठ्ठें करावा तें सुद्धां धड कळत नाहीं आम्हां लोकांना ?) राखून ठेवलेल्या अक्षता उदार मनानें फेकून दिल्या. अंतरपाट बाजूला होतांच वधू-वरांनीं गळ्यांत माळा घातल्या अणि जमाव पुन: एकदां पांगला. अंतरपाट धरणाऱ्या दोन भटजींपैकीं एक भटजी खूपच ठेंगू होता. त्यामुळें त्याला बराच वेळ हात ताठ वर धरण्याची शिक्षा झाली होती. अंतरपाठ खाली होताच खांदा आवळत तो खालीं बसला. आपली तेवढी उंची नाहीं तर त्याने अंतरपाट धरायला जावेंच कशाला ?

दरम्यान होमहवन सुरू झाले.

मध्येंच एकदां तोंड पुसण्यासाठीं म्हणून हातरुमाल काढला तर खायचीं पानें बाहेर आलीं. कारण हातरुमाल वरच्या खिशांत होता. पानें कोणीं पाहिली कीं काय हें चोरून पहावें लागलें.

आतां जेवण होईपर्यंतचा काळ थोडा रिकामा होता. त्या दरम्यान रांगतीं पोरें आपले पराक्रम गाजवीत होतीं. त्यामुळें त्यांच्या आया चड्ड्या आणत होत्या. पाण्याचे तांबे शोधत होत्या. कुमार वयांतलीं पोरें लपंडाव खेळूं लागलीं. बेसावधपणें फिरणाऱ्या वडील माणसांना नको तिथें धक्के देत, आपटत धोपटत त्यांचा खेळ चालू होता.

"ती ती दोन वेण्यावाली कोण गे ? अशी आपापसांत चौकशी करून कांहीं तरुण मंडळी लाईन टाकण्यांत गर्क होती.

"त्या नेवरेकरांच्या सूनेनें दागिने मागून आणलेत वाटतं ! त्यांची परिस्थिति कांहीं तशी बरी नाहीं !" असें कुणी तरी म्हातारी म्हणत होती.

"सातच्या सात पोरें घेऊन आलो आहे. म्हणजे दुपारचें जेवण आणि संध्याकाळचें आईस्क्रीम खपवावयाचें. घालायचे मात्र पांच रुपये !" असें आणखी कुणी तरी म्हणाली.

हा टोला कुणाला होता कोण जाणे. पण तो मला लागला एवढें खरें. कारण माझ्या खिशांत पांच रुपयांचें अहेराचें पाकिट होतें. (पण तिला हें अंतर्ज्ञान कसें झालें ?)

तेवढ्यांत आमची ही जवळ आली आणि माझ्या कानांत म्हणाली, "बघितलीत कीं नाहीं मुलगी ?"

"हो ! बघितली की ! बरी आहे !"

"कसली बरी ? पाणी तापवायचा बंब आहे !"

एवढा अभिप्राय दिल्यावर तिला थोडें बरें वाटलें. ती पुन: बायकांत मिसळली.

आपलीं सात मुलें घेऊन आपण सहकुटुंब घरीं जावें असा एकदां विचार मनांत आला. कारण त्या वातावरणांत वेळ काढणें, आणि विशेषत: जेवणासाठीं वेळ काढणें मला असह्य होत होतें. कारण जेवतांना ते वाढपी सुद्धां आमच्यावर तिरस्काराचे कटाक्ष टाकत "चोर लेकाचे ! फुकटचे खायला आले आहेत !" अशा भावनेनें वाढणार होते याची मला कल्पना होती.

मी स्वस्थपणें डोळ्यासमोर जें दिसतें तें पहात गप्प बसून राहिलों.

सुदैवानें तेथें आलेला प्रत्येक पुरुष, प्रत्येक बाई, इतकेंच नव्हें तर प्रत्येक शेंबडें पोर सुद्धां कार्य आपलेंच आहे असें समजून वागत होतें म्हणून बरें ! नाहीं तर मंगलकार्य पार पडणें कठीण ! ●●●



अनुक्रमणिका








# मी खून करतो

## (घर मालकाचा)

--श्रीराम कामत



**आमच्या** घरमालकाचा खून मीच केला ही गोष्ट आतां आमच्या गल्लींतच नाही, तर उभ्या मुंबईत आज चर्चेचा विषय झाला आहे. तसं म्हणाल तर लोकांच्या तोंडी आज दुसरा विषयच नव्हता. म्हणूनच या संबंधांत माझं एखादं जाहीर निवेदन प्रसिद्ध होणं जरूर आहे असं मला वाटतं. म्हणजे दुसरं कांहीं नाही. निदान मला तरी बरं वाटेल.

अर्थात माझ्या पक्षाच्या मंडळींच (आणि या लोकांची संख्या कांहीं कमी नाही. विशेष म्हणजे रोज भूमितिश्रेणीनं ती वाढत आहे. ईश्वर त्यांचं भलं करो!) मला आवर्जून सांगणं होतं की अशा निवेदनाची कांहीं गरज नाहीं. लोकांना समजतं. तीं गाढव नाहीत.

कुणास ठाऊक! मी तसं म्हणत नाही. फक्त माझी बाजू स्वच्छ शब्दांत एकदां स्पष्ट करावी म्हणतों. आणि या मुद्यावर तडजोड नाही; मग कोणी मला गाढव म्हटलं तरी बेहत्तर!

ईश्वर साक्ष आहे. खरं तेंच बोलतों. ही खूनाची बातमी मीच कळविली होती पोलिसांत. सांगितलं होतं कीं खून मी केला—माझा जबाब घ्या.

पोलिस अधिकाऱ्यानं मला चक्क धुडकावून लावलं. तो म्हणाला, "घरमालकाचाच खून केलांत ना? ठीक आहे. जा तुम्ही."

"अहो, कायद्यानं हा गुन्हा आहे—" मी सुचवलं.

त्यानं नकारार्थी मान हलवली. हंसून म्हटलं, "आं! आतां कायदासुद्धां तुम्हीच शिकवा आम्हाला."

तसं गयावया करीत मी म्हणालों, "या प्रकारामुळें निष्कारण मनस्ताप होतोय् साहेब मला. अभिनंदनपर तारांचा आणि पत्रांचा नुसता वर्षाव चाललाय्. खरी परिस्थिति लोकांना जर कळली-- दुसरं कांहीं नाही. माझं निवेदन तरी जाहीर कराच तुम्ही.'

"अच्छा! तुमचा आग्रहच असला--पण माझं मत विचाराल तर याची कांहीं जरूर नाही." पोलिस अधिकारी टेबलाच्या खणांत निवेदनाचा फॉर्म शोधीत पुटपुटला.

*जिकडे तिकडे महागाईचा मस्मसूर वाढत होता. इतर घरमालक 'परवडत नाहीं' म्हणून धडाधड भाडीं वाढवीत होते; पण आमचा घरमालक स्वस्थ होता. तो अधिकाधिक आमच्या सुखसोयींकडे लक्ष देत होता. गिलावा, रंग, छप्पर दुरुस्ती सर्व सर्व कांहीं मनापासून करीत होता....*

---

मध्येच त्यानं विचारलं, "काय म्हणालांत ? तुम्ही घरमालकाचा खून केलांत ? का करायला निघाला आहांत '?"

"खून करूनच मग वर्दी द्यायला इथं पोलिसचौकीवर आलों." मी जोरांत सांगितलं. प्रसंगाचं गंभीर स्वरूप त्याच्या ध्यानांत यावं म्हणून.

त्याच्यावर कांहीं परिणाम झालेला दिसला नाही. थंडपणं तो म्हणाला, "नाही, आमच्याकडे दोन वेगवेगळे फॉर्म असतात. म्हणून विचारलं."

त्यानं एक लांबलचक छापील फॉर्म भरण्यासाठीं माझ्याकडे दिला. त्यांत बऱ्याच गोष्टी होत्या. उदाहरणार्थ वय, धंदा, खूनाचं कारण (असलंच तर) वगैरे वगैरे.

त्या अधिकाऱ्यालाच मी विचारलं, "इथं कारण विचारलं आहे हो ! काय लिहूं ?" नाहीतरी हे असले फॉर्म भरण्यांत हीं लोकं चांगली तरबेज असतात. तेव्हा त्यांचाच सल्ला घेणं बरं असं मला वाटलं.

आणि त्यानंहि तो दिला. मोकळेपणानं. विचार करीत म्हटलं, "मला वाटतं, कांहीं एक कारण नाही असं लिहिणं बरं. किंवा नेहमीचींच कारणं असं लिहिलं तरी चालेल."

माझ्याशींच बोलत बसायला त्याला सवड नव्हती. दुसरी कामं होती. अधिक महत्वाची. निरोप घेताना सहज हंसत हंसत ह्या अधिकाऱ्यानं म्हटलं होतं; "अरे मारलंत ना ह्या घरमालकाला. आतां टाका निमूट जाळून. कशाला जबाब आणि निवेदनं ? काय ?" . . . . .

तर सांगायचं कारण पोलिसांकडे जाऊनसुद्धा माझ्याकडे कोणी लक्ष दिलं नाही. निदान या या मुलाखतीनं माझं तरी समाधान नाही झालं. लोक म्हणत घर-मालकाच्या खूनाच्या प्रत्येक केसमध्यें पोलिसाचीं लोकं लक्ष घालूं लागलीं तर त्यांना दुसरीं कामच करतां येणार नाहीत. म्हणजे असं बघा, हे घरमालक आढसूट घरभाड्यांत वाढ करीत रहाणार. सगळ्यांचीं नसलीं, तरी एखादा भाडेकरू नक्की मग टाळकं फिरवून घेणार. त्या भरांत घरमालकाला मुडदा पाडण्याची धमकी दिल्याखेरीज तो रहाणार नाही हे सुद्धां उघड आहे. लक्षांत राहिलंच तर घरमालकाचा तो खून करील. एरव्ही वेटा विसरून जाईल.

पण माझी केस यांतली नव्हती. माझा पराक्रम खरा होता. डोकं थंड ठेवून आणि सारासार सर्व विचार करूनच केलेला—उगाच माथं नव्हत फिरवून घेतलं मी.—तें हि [illegible] म्हणा ! पण मागाहून. आॅलवांम्बे भाडेकरी संघ नांवाच्या एका वड्या सार्वजनिक संस्थेनं चौपाटीवरील माझ्या जाहीर सत्काराचा प्रचंड कार्यक्रम जाहीर केल्यावर. सार्वजनिक क्षेत्रांत अपूर्व स्वार्थत्याग आणि अजोड मनोधैर्य दाखवून घरमालकांकडून भाडेकरूंची होणारी राक्षसी पिळवणूक चव्हाट्यावर आणल्याबद्दल या वर्षीच पराक्रमाचं सुवर्णपदक मला देण्याचा सदर संस्थेनं निर्णय घेतला होता.

हें कळलं मात्र आणि माझ्या छातींत धडकी भरली. एकदम ब्लडप्रेशर वाढलं. कोणत्याहि क्षणीं 'हार्टफेल' होण्याची शक्यता उत्पन्न झाली. दुपारला सोडाच, रात्रीसुद्धां झोप येईना. तर आतां आणखी काय सांगूं—

होय ! यावर उपाय एकच. निदान माझ्या मतानं. उगाच इतके दिवस गप्प राहिलों. म्हणजे आतां अगदीं हद्द झाली होती. खरं काय तें सांगून मला एकदां मोकळं झालंच पाहिजे. नाहीतर धडगत नव्हती.

तेव्हा माझं हें निवेदन ऐकाच तुम्ही. आणि मग ठरवा . . . माझी काय चूक ?

मी आणि मिसेस् (आमच्याच) या जागेंत पहिल्यानं आलों तो दिवस आजहि मला आठवतो. नाहीतर आठवणींत-रहावा असाच तो आहे. मुंबईत जागा मिळत नाहीं. मिळालीच तर जाम पागडी पडते वगैरे गोष्टी लग्न करून बसल्यापासून रोज आम्ही ऐकून राहिलों होतों. राहिलों होतों अर्थात श्वसूरांकडे. त्यांच्या दोन खोल्यांत अडगळ होऊन चांगली चार वर्ष लटकत होतों. तर अमुक गल्लींत तमुक बिल्डिंगमध्यें एक जागा खालीं होण्याची शक्यता असल्याचं एकदिवस उडत उडत कानीं आलं. मिसेस्ना मी म्हटलं, "मंगेशाला नवस बोल—आणि तडक चल."

बातमी खरी होती. म्हणजे हा शकुन उत्तम होता.

जागा दाखवायला स्वत: घरमालक आमच्याबरोबर आला. दुसऱ्या मजल्यावर. सबंध एक खोलीचा ब्लॉक. पार्टिशन घालून दोन खण केलेले. चार बिऱ्हाडांना अख्खा एक संडास, नळ, बाथ-रूम वगैरे आणि अपूवाई ही कीं जागा खालीं होती. मला न् मिसेसला तरी हीच गोष्ट महत्वाची वाटली. जागेकडे लक्षहि नव्हतं.

घरमालकाच्या तें लक्षांत गेलं. शरमल्यासारखा होऊन तो म्हणाला, "अरे या फडताळांचीं दारं मोडलीं आहेत. भिंतींचा रंग गेलाय्, खालीं हा कोबा तर पार फुटलाय्—"

माझ्या छातींत धस्स झालं. ही कशाची प्रस्तावना आहे कळेना. मध्येंच मी ओरडलों, "अहो कुठं काय ? कांहीं नाहीं. जागा अगदीं उत्तम, छान आहे."

आमची मिसेस् आणखीन कासावीस झाली. जशी कांहीं वडिलांच्या जागेंतून हलण्याची तिलाच अधिक घाई होती. "मालक. तें सगळं आम्ही करून घेऊं—आमच्या खर्चानं."

"तीन महिन्याचं भाडं अगाऊ" मी आमिष दाखवलं.

"आणि पागडी. हजारापर्यंत." या आमच्या सौभाग्यवतीच्या आवाजांत भलताच गोडवा.








घरमालक आपल्याच विचारांत होते–बहुतेक हिशोब चालला असावा. आमच्या बोलण्याकडे त्याचं लक्ष नव्हतं. चाचरत त्यानं म्हटलं, "चार दिवस थांवत असाल तर –"

"छे: छे: ! आत्तां, या क्षणीं, ही आहे अशीच जागा हवीय आम्हाला." मी अगदीं गळयांतच पडलों.

"अहो, पण फडताळाचीं दारं, भिंतीचा रंग, हा कोबा–" घरमालक विनवूं लागला. अपराधी स्वरांत. "उद्यां तुम्हीच म्हणाल."

"उद्यांच काय, आत्तांसुद्धा तुमच्या विरुद्ध कांहीं म्हणणं नाही हो आमचं, म्हणूं तर जीभ झडून जाईल." म्हणजे मिसेस् भलतीच विरघळली होती यांत शंका नाहीं. "अगदीं–अगदीं देवमाणूस हो !"

तिकडे संपूर्ण दुर्लक्ष करून घरमालकानं संथपणं सांगितलं, "महिना वीस रुपये भाडं पडेल."

वीस रुपये ! मी अक्षरश: ठार झालों. तोंड उघडं, डोळे ताठ. बघतच राहिलों. हा माणूस इथं मुंबईंतच आहे का आणखी कुठं ? मला कळेना. काय बोलावं सुचेना. मिसेसची पण अगदीं हीच स्थिति झाली.

तसा तोच बोलला, "कां हो ? भाडं जास्त वाटतं ?"

"ना - नाही." माझ्या आधीं तिकडे मिसेस सावध झाली. अडखळत तिनं विचारलं, "आणि पागडी ?"

"नो पागडी, नो डिपॉझिट. ओन्ली वन मन्थ रेन्ट ॲडव्हान्स." त्यानं इंग्रजींत खुलासा केला.

आणि तेव्हाच मला शंका आली. म्हणजे घरमालकाचं एकूण लक्षण ठीक नव्हतं.

पहिल्याच महिन्यांत न सांगतां आमच्या जागेंतील फडताळांना त्यानं दारं बसवून दिलीं. जमिनीचा कोबा नीट करून दिला. पण त्या महिन्याची भाडंपावती बघून मात्र मी चाट पडलों, भाडं फक्त वीसच रुपये ? वाढ नाही ? माझें मलाच तें बरोबर वाटेना. म्हणजे हा व्यवहार नव्हता.

घरमालकाला मी विचारलं, "अहो, या महिन्यांत या जागेवर तुमचा इतका खर्च झाला, तरीसुद्धां भाडं वाढलेले दिसत नाही ?"

हंसून त्यानं म्हटलं, "फक्त पन्नास रुपयांचा प्रश्न. त्यांन भाडं काय वाढवायचं ?"

"असं कसं म्हणतां तुम्ही ? पन्नास रुपयांचं व्याजच येतं साठसत्तर रुपये."

"पठाणाकडे. मी पठाण नाही."

"च्यायला ! हें आणि वर !......"

हा कसचा होतोय पठाण ? घरमालक खरा, पण तोसुद्धां चारचौघांसारखा नव्हता.

पुढं दोन महिन्यांनी घरमालकांची स्वारी एकदिवस आमच्या दारीं आली. जरा बिचकतच तो आंत शिरला. ओशट चेहऱ्यानं. त्रास दिल्याबद्दल दिलगिरी व्यक्त करूं लागला. मला वाटलं, घरभाड्यांत वाढ झाली असणार. आणि हेंच सांगायला तो आला असावा.

पण कुठं हो ? त्याला जागेला रंग द्यायचा होता.

मी म्हटलं, "कशाला नसता खर्च ? तसा भिंतीचा रंग कांहीं अगदींच उडालेला नाही. दिसतोय कुठं कुठं, थोडा थोडा."

"पांच वर्षांत रंग दिलाय कोणी ?" हा आमचा घरमालक. दिलगिरीचा सूर कायम. त्याच्या स्वभावाचा स्थायीभावच तो.

"बरोबर आहे. रंगांच्या किंमती कोण वाढल्यांत ?"

"दुप्पट झाल्यांत." त्यानं कबूल केलं.

मी एकदम विचारलं, "मग भाड्यांत वाढ करणार असालच ?"

"छे: छे: ! अहो, जागेला रंग देणं मालकाचं कर्तव्यच आहे."...

आतां सांगा या अशा अर्धवट घरमालकाबद्दल मला कां आदर वाटावा ?.......

या नंतरचा प्रसंग तर बिलकुल वैतागजनक होता. त्याला मी सांगत होतों भल्याचं, हिताचं. त्याच्याच. सिमीट, लोखंड, लाकूड वगैरे घरांना लागणाऱ्या मालाच्या किंमती वाढल्यामुळं मुंबईत सगळ्याच घरमालकांनी घरांचीं भाडीं पन्नास टक्के वाढवलीं होतीं. मला ही गोष्ट कळली. प्रामाणिकपणं मी ती आमच्या मालकाच्या कानावर घातली.

पण तरीहि जागेचं भाडं वाढविण्याचं तो मनांत घेईना. तो विचार त्याच्या मध्धड टाळक्यांत शिरेनाच.

"घरबांधणीचा खर्चच मुळीं शंभर टक्के वाढलाय्." घरमालकाला मी त्याच्या धंद्याची माहिती देऊं लागलों.

"शक्य आहे !" त्यानं मत दिलं." पण मला काय त्याचं ? मी कांहीं नवीन घर बांधायला काढलेलं नाही. माझी ही इमारत जुनी. चाळीस सालची. तींत गुंतलेल्या भांडवलावर दहा टक्के व्याज आजहि भाड्याच्या रूपानं मला येतंय्. बँकांतसुद्धा इतका दर मिळत नाही."

मग मी जोर धरला. "असा विचार करून कसं चालेल मालक ? अहो, निदान कुटुंबाचा तरी विचार करा."

"कुटुंबाचा ?" त्याचा प्रतिप्रश्न. अशा विचित्र स्वरांत कीं माझी सूचना पोरकट असल्याचं मलाहि जाणवावं.

पण मी नाही गप्प बसलों. उसळून म्हणालों, "तें तुमचं कर्तव्य आहे. तुमच्या कुटुंबाचा विचार तुम्हाला केलाच पाहिजे."

"आं !"

"खोटं नाही. आज टाइम्सला एक पत्र आहे. भारी सुंदर, मुद्देसूद. वाचाच तुम्ही. एका त्रस्त घरमालकानं लिहिलं आहे. या पत्रांत तो म्हणतो कीं घरांतील खर्च असाच वाढत राहिला तर आपल्या कुटुंबाच्या भवितव्याचा विचार करणं घरमालकाला भागच आहे. कोणालाहि एकदम पटेल असा हा मुद्दा आहे बघा."

"मला नाही पटत." आमचा घरमालक म्हणाला, "कारण मला कुटुंबच नाही. लग्न झालं नाही."

म्हणजे हें असं होतं तर ! त्याचं लग्नच झालेलं नव्हतं. अर्थात त्याला कुटुंब नव्हतं. तेव्हा मागं त्याच्या नांवानं बोंब मारणारं कोणी नव्हतं.

आणि मला वाटतं याचक्षणीं ती कल्पना प्रथम माझ्या मनांत नकळत चमकून गेली असावी.

अनुक्रमणिका






पुढं तर दिवसच असे येत राहिले कीं घरमालकांचा नाइलाज व्हावा अकदीं, निरुपाय व्हावा. आधीच महागाई अशी होती कीं तज्ञांना प्रश्न पडे — खऱ्या किंमती काय अन् महागाई कोणची ? अशांत घरपट्टी वाढली, शिक्षणकर आला, प्राप्तिकर चढला. आणखीहि खूप कर बसले. हे कर घरांवर किंवा त्यांच्या मालकांवरच बसायला हवेत असाहि नियम नव्हता. कशावर, कुठंहि आणि केव्हांहि बसवले तरी घरभाड्यांत वाढ होणं अपरिहार्य होतं. बरोबर होतं. घरमालक जगला तर मुंबई जगणार ! आणि तो जगायला हवा तर घरांचीं भाडीं वाढवणं हा एकच उपाय होता. म्हणून म्हणतों आपलं कार्पोरेशन करीत होतं तेंच बरोबर होतं. आपलं सरकार करीत होतं तेंच बरोबर होतं. भाड्यांच्या बाबतींत घरमालकांवर नसते निर्बंध घालणं हिताचं नव्हते. त्यांच्या, व म्हणून ह्या मुंबईच्या अर्थात राष्ट्राच्या. तसंच म्हणाल तर करवाढीची देखील गरज नव्हती. शेअरबाजारांतील मंदी, तिसरी पंचवार्षिक योजना, निवडणुका— थोडक्यांत कसलीसुद्धां लहानमोठी घटना मुंबईतील आमच्या घरमालकांना हवालदिल करायला पुरेशी होती. आणि याचा परिणाम घरांचीं भाडीं वाढण्यांत झाला तर तो त्यांचा दोष नव्हता. खरोखरच नव्हता.

वृत्तपत्रं नियमितपणं चघळण्याची मला संवय आहे. म्हणूनच या गोष्टी मला कळत होत्या. नाही, पटतसुद्धां होत्या.

कळत नव्हतं आमच्या घरमालकाला. आणि मी कितीहि समजून सांगितलं तरी पटत नव्हतं. या माणसाला भरीव दृष्टिकोन नव्हता, राष्ट्रीय जाणीवच नव्हती. स्वतःचं हित समजत नव्हतं. गेला खड्डयांत ! त्याबद्दल माझी तक्रार नव्हती. पण इतर घरमालक धडाधड भाडीं वाढवीत असताना, आपण ह्या गांवचाच नव्हे अशा थाटांत हा आपला खुशाल स्वस्थ बसला होता. दुसरं कांहीं नाही, पण यामुळं एक वाईट पायंडा पडत होता. लोकांना एक गलिच्छ उदाहरण सांपडलं होतं. इतक्या कठिण परिस्थितींतसुद्धां भाडं न वाढवणारा घरमालक— म्हणजे बघा, वाचून कससंच होतं. सरळ नाही वाटत. चमत्कारिक, अशक्य वाटतं. माझी तर खात्रीच झाली कीं आमचा घरमालक चक्कर असला पाहिजे, विकृत असला पाहिजे. त्याच्या डोक्यांत अळ्याच पडल्या असाव्यांत. म्हणूनच 'मालक आत्तां भाडं कधीं वाढवतां,' असं विचारलं कीं मख्खपणं तो उत्तर देई, "कशाला ? दहा टक्के व्याज सुटतंय् मला. आणि तेंच रग्गड आहे."

मला मात्र प्रश्न पडला होता याला आत्तां काय करावं ?

तो प्रश्न अनायासं सुटला. म्हणजे त्याचं असं झालं. चिन्यांनी आपल्या या राष्ट्रावर हल्ला केला. आपला विश्वासघात केला. सरकारनं देशांत आणीबाणी पुकारली किती गंभीर प्रसंग ! आत्तां घरमालक याला काय करतील ?. त्यांना करतां येण्यासारखी फक्त एकच गोष्ट. आणि त्यानं ती केली घरभाडीं वाढविलीं.

तशी चार दिवस मी वाट पाहिली. घरमालकाला भरपूर संधि दिली. पुढील महिन्यापासून घरभाड्यांत वाढ करण्यांत येत आहे अशी त्याची नोटीस आतांतरी नक्कीच येईल असा माझा तर्क होता.

आणि मग असह्य झालं तेव्हा मीच उठून आगाशी वरील त्यांच्या खोलींत गेलों. बघतों तर हा आपला तबला बडवीत, 'तक् धिन् धीन् तक्'-ची समाधि लावून बसला होता. वैतागच नाही, तर संताप आला मला. घरमालकांवर कोण गंभीर प्रसंग कोसळला होता ? त्याचा विसर पडला म्हणून याचेच इतर जातभाई तिकडे 'सी. सी. आय.', 'रेसकोर्स', किंवा अशाच कुठल्या कुठल्या बड्या क्लबांत नरम तबियत गरम करीत होते. आणि आमचा हा— हा नालायक ! तिथंच माझा निश्चय झाला. घरमालक म्हणून जगायला हा माणूस लायक नाही. सुधारण्याची आशा नाही. त्याला अधिक जगूं देण्यांत अर्थ नाही.

पाकिटांतून दहाच्या दोन नोटा काढून त्याच्या अंगावर भिरकावीत मी ओरडलों, "घ्या ! वीस रुपये— भाडेवाढ."

तबल्याच्या साथींत, तान आळवावी तसा तो किंचाळला, "नाही घेणार. भाडं मी वाढवणार नाही."

मी अधिक हुज्जत घालीत बसलों नाही. त्याच्याच पुढ्यांतील डग्गा मी उचलला आणि सरळ टाळक्यांत घातला.

पुढं काय झालं, मला नीट सांगतां येणार नाही. जरूरहि नाही. माझं काम झालं होतं. आत्तां ह्या तबल्यावर त्याचं जिवापाड प्रेम असेल ही मला कल्पना नव्हती. शिवाय घरमालकाचं हृदय (असलंच तर ! मला शंका आहे) इतकं कमकुवत अनू शकतं या गोष्टीवर माझा तरी बिलकुल विश्वास बसत नाही.

आतां डॉक्टर तसं म्हणतोय खरा. म्हणणारच ! नाहीतरी डॉक्टर लोकं दुसऱ्यांना 'क्रेडिट' देणारच नाहींत !

तर खरा प्रकार असा आहे.

आणि असं असूनहि त्या 'सोडा वाके गडकरी संघा'ला चौपाटीवर माझा जाहीर सत्कार करण्याची आग असली तर खुशाल करा म्हणावं. मी हजर राहीन. नाहीतरी माझा जाहीर सत्कार कधीं झालेला नाहीच.

(वि. सू. :— साहेबांच्या बऱ्याच गोष्टी आपण उचललल्या आहेत त्यांपैकींच ही एक. चूकभूल मात्र माझी. आजकल इतकंच नाही तरी 'मेड-इन— इन्डिया' राहिलंय्— लेखक.) •••



बाळ्या, त्या रेडियोवर समर-संगीत लाव पाहूं. म्हणजे बाबांचा ताप बघ कसा, कुठल्या कुठें पळून जाईल.



--वसंत फेणे




## एक सरळसोट आणि गुंतागुंतीची समस्या

**आमच्या** संसारांत मोलकरीणीनें काम सोडून जाण्यानें जेवढी मोठी समस्या निर्माण होते, त्यापेक्षां मोठी समस्या नवी मोलकरीण मिळाल्यावर माझ्या समोर (नव्या मोलकरणीच्या रूपानें) उभी रहाते. तिला—म्हणजे समस्येला आणि मोलकरणीलाहि मलाच तोंड द्यावें लागतें. हा प्रकार जेवढा दुर्दैवी तेवढाच खरा आहे. कारण आमच्या घरांत माझाच मोलकरीणीशीं अधिक संबंध येतो. अपरिहार्यपणें माझी इच्छा नसतांना. मोलकरणीशी असे संबंध 'डेव्हलप्' करण्यांत मला खरोखरच कांहीं आनंद होत नाही.

पण माझी बायको आहे श्रमिक महिला ! म्हणजे ती एका कचेरीत नोकरी करते. तिची फर्म प्राइव्हेट असल्यानं तिला कचेरीत वेळेवर जावं लागतं. (साऱ्या कचेऱ्याचं राष्ट्रीयीकरण करावं असं हल्ली माझंहि मत बनलं आहे.) "तुमचं आपलं बरं आहे. तुमची सरकारी नोकरी. कधींहि गेलं तरी तुम्हाला सरकार विचारायला येत नाही. आम्हाला वेळेवरच्च गेलं पाहिजे." असं तिचं म्हणणं. म्हणून होतं काय, ती मोलकरीण कामाला येण्यापूर्वीच नऊ पंधराची फास्ट पकडायला निघून जाते नि मोलकरणीनें धुणी भांडी केल्यावर मला ऑफिसला जावं लागतं. लग्नानंतर मी त्यामुळें कधींच वेळेवर गेलों नाही. पण सहकार खात्यांतले आमचे अधिकारी माझ्याहून उशीरा येत असल्यामुळें मला कांहीं तसा त्रास झाला नाही. (कदाचित् त्यांची पत्नीहि एखादी श्रमिक महिला असावी !)

माझ्या कचेरीतील सहकाऱ्यांत मात्र उगीचच गैरसमज पसरलेत. त्यांना आपलं वाटतं की राजा-राणीचा संसार— मजा करतोय लेकाचा. पण वस्तुस्थिति उलट आहे. (श्रमिक महिलेच्या नवऱ्याचं दुःख सांगण्याचं हें स्थळ नव्हे) बायको लवकरच जाते अन् मी बिचारा कपाळाला आंठ्या घालून मोलकरीण कधीं ही वया काम आटपून जाईल म्हणून तिच्याकडे पहात असतो. पण कचेरी-






*मोलकरीण कामाला आली नाही कीं मीच मग सर्व काम करीत असे. तशी बायकोहि दिमतीला होतीच. पण आमच्याकडे येणारी प्रत्येक नवी मोलकरीण म्हणजे आपापल्या अंगच्या नव्या गुणाची गुणवंती. पण ही जी नवी मोलकरीण आली ती तर....?*

तल्या कुचेष्टेखोरांना काय त्याचं ! कचेरी-तलेच कां, शेजारचे सौ. पार्वतीकाकूंचे यजमान माझी अवस्था पाहत असतांनाहि विपर्यास करतात. ते एकदा चक्क मागीलदारीं येऊन आंतल्या पार्वतीकाकूंना म्हणाले, "आजकालचे तरुण काय चेकाळलेत ! लग्नानंतर लगेच बारीक नजरेनें मोलकरणीकडे पहातात. आमच्यावेळीं इतकं नव्हतं !"

एक मोलकरीण काम सोडून गेली म्हणजे धुणी भांडी आम्हालाच करावी लागतात. अर्थात् माझी बायको नोकरी करीत असली तरी मध्यमवर्गीय हिंदु स्त्री आहे. ती हें काम स्वतः करते. त्यावेळीं गृहकृत्यांतील तिला या दक्षतेमुळें मला तिचा अभिमान वाटतो. स्वतःवर मी खूष होतो. नोकरी करून घरचं करणारी नि वेळप्रसंगी धुणीभांडी करणारी हुशार बायको मला मिळाली म्हणून स्वतःला भाग्यवान् समजतो. आणि तिला मदत करायला सरसावतो. खरखटयाभांड्यावर ती पाणी टाकते नि मी तीं राखेने घासतो आणि तिने नळ सोडल्यावर त्या धारे-खाली धुवून काढतों. पुनः एकदां भांडी विसळण्याचं नि ती आंत नेऊन ठेवण्याचं वगैरे वगैरे साऽऽरं काम तीच करते.

धुण्यांच्या बाबतींतहि कपडे साबण लावून धोपटून, पाण्यांतून खळबळून काढून, नि पिळून मी तिला मदत करतो. बाकीचं सारं तीच करते. मी केलेल्या मदतीबद्दल ती कृतज्ञ असते ! ती मनःपूर्वक म्हणते, "तुम्ही थोडी थोडी कां होईना पण मदत केल्यानं सारं काम मी किती झटपट आवरलं नाही ?" आजकालच्या कित्येक स्त्रियांत ही वृत्ति असतेच कुठें ? त्या सरळ म्हणतात, "आपल्या घरचं काम केलं तर उपकार कुणाला ! संसार काय माझाच तेवढा आहे ?" नि यामुळेंच मोलकरीण नसल्यामुळें धुणी भांडी माझ्या बायकोच्या बोकांडी बसली म्हणजे मला भारी वाईट वाटतें. इतकी चांगली गुणी पोर—तिला इतके कष्ट पडूं नयेत असें वाटतें. पण जेव्हां नवी मोलकरीण मिळते तेव्हां नवी समस्या माझ्यापुढें उभी ठाकते !

माझी बायको चांगली असली (नि मी आहेच) तरी आमच्यांत कुरबुरी होतात; नाहीं असें नाहीं. पण अशा प्रकारें मोलकरी-णीशीं माझा संबंध येत असल्यामुळें आमच्यां-तील वितुष्टें वाढत असतात. रोजच्या कुर-बुरींतील निम्मी कुरबूर मोलकरीणीवरूनच होते.

आमच्याकडे पहिली मोलकरीण जी होती, ती तरुण होती, सिनेमा भरपूर पहाणारी होती, अन् एकंदरीत चांगलीच होती. पण ती काम व्यवस्थित करीत नसे. याला मी बापडा काय करणार ? मी काय तिला मुद्दाम काम वाईट करायला सांगत होतों ? पण सौ.चं म्हणणं "तुम्ही तिच्याकडून नीट काम करून घेतच नाही." तिचं काम नीट नव्हतं हें मान्य. तिनं घासलेल्या भांड्याला एखाद्यावेळीं खरखटं नसलं तर राखाडी तरी असायचीच. पण मी त्याला काय करणार? मी सात्विक संतापानं म्हणालों, "मी काय करायचं तिला ?"

"काय म्हणजे ? माझ्याकडून कसं करून घेतां सारं आपल्या मनासारखं ?" हें कांही सारंच खरं नाही; पण ऐकायला बरें वाटतें. मी देखील 'नवरे' पणा 'गाजवितो' असें उगीचच वाटतें. म्हणून मी गप्प बसतों झालं.

एकें दिवशीं ऑफिसला जायची घाई असतांनादेखील दुधाच्या पातेल्याची खरवड दाखवून मोलकरणीला म्हटलं, "हें काय ? ही काय भांडी घासायची रीत झाली ?" ती उजव्या हाताची तर्जनी ओठावर ठेवून डावा हात कमरेवर ठेवून भुंवया कमानदार करून त्या खरवडीकडे क्षणभर जयश्री गडकर सारखी पहात राहिली. मग मोट्ठे मोट्ठे डोळे करीत असं ज्याच वर्णन करतात तसे वैजयंतीमालेसारखे डोळे करून म्हणाली "मग काय करावं आमी ? तुमास्नी हपीसची गर्दी असते म्हणूनशान् असं व्हनं !" तिच्या चुकीबद्दल तिनं अशा रीतीनं मलाच 'responsible' धरावं याचा मला राग आला. पण तिचं म्हणणं अगदींच कांहीं चुकीचं नसावं अशी शंका आली. तरी मी खचलों नाही. मी प्रत्युत्तर केलं, "असेल. पण मग आम्हाला बोलणीं खावीं लागतात कीं !"

"अगो बया !" मधाच्यासारखेच डोळे करून ती म्हणाली "कुणाची ?"

"कुणाची म्हणजे — म्हणजे —" खरं म्हणजे मी चांचरलों. पण तें न दाखवतां पुनः एकवार "म्हणजे—म्हणजे" म्हणून चटकन् बोललों "तिला आवडत नाही हें —"

मला मध्येंच तोडून ती आश्चर्यानं उद्-गारली. "म्हणजे ऽऽ ? असं बाईस्नी नावडाय-सारखं तुमी मला करताय तरी व काय ?"

"तुमचं काम नाही आवडत तिला !" मी मोठा आवंढा गिळून उद्गारलों. "त्यामुळें ती—ती—ती—" तशी ती, "छा :! काय नटीच. तुमास्नी बघल त्यो टकरल. मंग बाई म्हंजे इचारायच नग" म्हणून सिनेमांत - कोल्हा-टिणीची भूमिका करणारी छबेली (पिटांतल्या शिट्ट्या समवेत) उजवा पाय कन्दिशीं कमरे-इतका वर घेऊन टुणक उडी मारते तशी पायरी वरून उडी मारुन पळाली की हो ! तिच्या अंगांत बहुधा हंसा वाडकर किंवा उषा किरण संचारली असावी.

अशा परिस्थितींत कुणी झालं तरी काय करणार ? पुढें ती लौकरच जाऊं मी असें (घरीं) न विचारतांच सिनेमांत नटी होण्या-साठीं पळून गेली अन् माझ्यापुढील समस्या सुटली !

त्यानंतर जी मोलकरीण आम्हाला लाभली. ती एकदम टॉप होती. निदान पहिल्या एकदोन दिवसांत आमचं तसं मत झालं. आणि पहिली मोलकरीण सिनेनटी होण्यासाठीं गेली ही इष्टापत्तीच वाटली. ही मोलकरीण उतार वयाची होती. तोंडानें बडबड नाही आपण बरं कीं आपलं काम बरं. हो, काम बरंच असायचं. भांडीं लख्ख, धुणी स्वच्छ. पण एकें दिवशीं ती बराच वेळ झाला तरी आली नाही. मी वाट पाहून दमलों. कचे-रीला जायला उशीर होत होता. मी शृंगापत्तीत







सांपडलों होतों. शेवटीं ऑफिसला स्वच्छ दांडी मारण्याचा निर्णय घेऊन शृंगापत्तीतून सुटका करून घेतली. हो, मोलकरीण यायची नि मी नाही म्हणून जायची असं व्हायला नको. पण नाही. ती उगवलीच नाही. मी मात्र माशा मारीत वेळ काढला.

सायंकाळीं बायको कचेरीतून आल्यावर मी शुभ-वर्तमान तिच्या कानावर घातलें नि हंसलों. कां हंसलों, तें समजलें नाहीं. अलिकडच्या कथांतील पात्रें उगीचच कांहीं कांहीं करीत असतात तसें पण माझें हें (बहुधा वरच्या पातळीवरचें हंसणें) तिच्या ध्यानांत आलें नाहीं बायका कितीहि शिकल्या नि कचेरींतून कामें करूं लागल्या तरी बायका त्या बायकाच. बुद्धीचं काम म्हटलं कीं अडलेंच घोडें ! पण घोडें अडलें तरी सौ. चें तोंड सुटलें, "हंसताय् काय ? कम्माल आहे बाई माणसाची ! मोलकरीण आली नाही, नि तुम्ही काय माशा मारीत बसलां धुणी मांडीं ठेवून माझ्यासाठीं ?"

"अग, – अग हें माझ्या ध्यानांतच आलें नाहीं."

"हो, कशाला येईल ? मी आहे न करणारी ! दुसरी कुणी असती तर कळलं असतं——"

तिचे हात धरून मी भावनावेगानं म्हणालों, "ए, असं नाही हां बोलायचं. मला तुझ्याशिवाय कुण्णी कुण्णी नको. खरंच. अगदी !" तिचा राग अर्थातच पळाला. मी देखील चुकीची भरपाई करण्यासाठीं नेहमीपेक्षा अधिक मदत केली. मोलकरणीच्या दुसऱ्या वेळच्या खाड्याला मी तशी चूक केली नाही.

पण असे तिचे खाडे वारंवार होऊं लागले. सौ. नें मला तंबी दिल्यानें मी एक दिवस तिला खडसावलें. "तुम्ही नेहमी नेहमी असं करतां याचा अर्थ काय ?" ती बाई मोजकंच बोलणारी. तें देखील प्रसंग पडला तरच. माझ्या प्रश्नाला तिनं नुसतं माझ्याकडे पाहून उत्तर दिलं. मला भाझेच कांही चुकलं नाहीं ना असा संशय आला. मी स्वतःला सांवरण्यासाठीं म्हटलं, "म्हणजे तुम्ही खाडा करतां." "माझी तशी रीतच आहे !" ती मोजकंच बोलली. ही काय रीत झाली ? अन् ही वया तर उघड उघड सांगते ही रीतच आहे ! मी चिडलोंच. म्हटलं, "ही कसली आहे रीत? आमची गैरसोय किती होते त्यामुळें ?" या प्रश्नावर त्या मितभाषी मोलकरणीनें पुन्हा एकवार माझ्या नजरेला नजर भिडवली. परत माझं कांही चुकलं असावं अशी मला शंका आली. मी स्वतःला सांवरीत म्हणालों, "तुम्ही आधीं कांहीं पूर्व सूचनाहि देत नाही. त्यामुळें– त्यामुळें विशेषच त्रास होतो."

"पण माझी तशीच रीत आहे ?"

"म्हणजे यायचं नसलं तरी सांगायचं नाही आधी, अशी रीत आहे ?"

"तसं जमलं तर सांगितलं असतं !" असं म्हणून ती या गृहस्थाशीं फार बोलण्यांत अर्थ नाही असें नजरेनें दर्शवित मांडी घेऊन नळावर गेली. मी सायंकाळीं इमानीपणानें सकलवृत्तांत सौभाग्यवतीस सादर केला. "तुम्ही तिला व्यवस्थित 'टॅकल्' केलेलं दिसत नाही." असा अभिप्राय व्यक्त करून" पाहूं आपण काय करतां येईल तें" असा दिलासाहि तिनें मला दिला.

मोलकरणीच्या रीतींत बदल होत नव्हता. शेवटीं आम्ही दोघांनी खूप खूप विचार करून ठरवले कीं ती गैरहजर राहिली तरी तिला आम्ही पूर्ण पगार देतों म्हणून ती शेफारते. अर्थात् तिच्या गैरहजेरीबद्दल पैसे सरळ कापावे. तिनें विचारल्यास म्हणावें "न सांगता खाडा करण्याची तुझी रीत; तशी खाड्याच्या दिवसाचे पैसे कापायची आमची रीत. तिची रीत तशी आमचीहि रीत. येईल सुतासारखी सरळ. आम्ही फारच 'लिनियण्टली' वागतो म्हणून ती आमचा 'अन्डयू ॲडव्हाण्टेज' घेते" सौ. उत्साहाने म्हणाली, "नाही तर काय?" असें म्हणून मीहि तिला अनुमोदन दिलें.

त्या महिन्याला तिचा पगार देतांना मी एक रुपया कमी दिला. (हिशेबानें अडीच होत होते. पण म्हटलें जाऊं द्या.) मोजकें बोलणाऱ्यानेंहि जरूरच पडली तर– बाईनें नजरेतंच

(पान ४४ वर पहा)








**एक खुमासदार एकांकिका....**

—सई परांजपे



**(जयंत आणि बाबासाहेब तणतणत आंतल्या खोलींतून भांडत भांडत बाहेर येतात.)**

**जयंत :** पण बाबा, ऐकून तर घ्या माझं—

**बाबासाहेब :** दोन वर्षं ऐकून घेतलं. पुष्कळ झालं. आतां बऱ्या बोलानं मुली पाहयला तूं माझ्याबरोबर संगमनेरला चलतो आहेस कीं नाहीं ? पत्रांना तूं बधेनास म्हणून मला यावं लागलं इतक्या लांब. (कोट घालूं लागतात)

**जयंत :** बाबा, मुली बघून मला लग्न करायचं नाहीं.

**बाबासाहेब :** तूं नको बघूस. आम्हीं बघतो तुझ्यासाठीं

**जयंत :** तसं तर मुळीच नको.

**बाबासाहेब :** तुला मुली बघायला तरी सांगतोय. आम्हांला तेवढी देखील सवलत नव्हती. तुझ्या आईला एकदम आंतरपाट बाजूला झाल्यावरच प्रथम पांहिलं मी.

**जयंत :** तेव्हांचा जमाना वेगळा होता बाबा.

**बाबासाहेब :** जमाना वेगळा होता ! तेव्हां कांहीं लग्न लागत नव्हती कां सगळं यथास्तित होत नव्हतं ? फार सवलत दिली तुला आजपर्यंत. बापाची एवढी मोठी इस्टेट आहे, स्वतःला चारशें रुपायांची नोकरी आहे, आणि म्हणे लग्न करणार नाहीं.

**जयंत :** गैरसमज होतोय तुमचा. लग्न करणार नाहीं असं कुठं–म्हटलं मी ? मी फक्त मुली पहाणार नाहीं, माझं लग्न मीच जमविन कुठतरी.

**बाबासाहेब :** वाहवा. तोंड बघा. एक नंबरचा बावळा तूं, लग्न जमवायला निघालाय. आज पंचविसावं वर्षं लागलं तुला, पण एखाद्या मुलीशीं ओळख सुद्धां नाहीं तुझी. लग्न जमवायला अंगांत धमक असावी लागते धमक.

**जयंत :** असेल माझ्या नशिबांत तर घरीं चालत येईल एखादी मुलगी आपण होऊन.

**बाबासाहेब :** मुलगी चालत येऊं दे आपणहून, मी मात्र चालता होतो आतां येथून. (तरातरा दारापर्यंत जातात) लग्न जमेपर्यंत संगमनेरमध्यें पाऊल टाकलंस तर

अनुक्रमणिका

*तो म्हणे मुली पाहून लग्नच करणार नाही. पण ...दिवशीं भेटली त्याला एक परी....अन्*

*गेला त्याचा जीव भाळून आणि म्हणे तो आता, 'अहो....मी एकटाच आहे कीं........!'*

याद राख. (जातात. जयंत पण रागावला आहे. अस्वस्थपणें तो कपाट उघडतो, मिटतो. पुस्तक वाचायचा प्रयत्न करतो. अखेर दाढीचें सामान काढून दाढी करायला बसतो. तोंडाला भरपूर सावणाचा फेस लावून होताच दारावर टक् टक्.)

**जयंत :** आंत या. दार उघडंच आहे (पुन्हा टकटक) अहो उघडं आहे दार, कमिन. (थोडा वेळ स्तब्धता. मग हळूंच दार उघडते व पांढरे नीटनिटेक कपडे केलेली एक चिटुकली मुलगी हळूंच आंत येतें. एक भली मोठी पिशवी तिच्या हातांत आहे. मुलगी दाराजवळ उभी.) आं ? कोण पाहिजे तुम्हांला ?

**मुलगी :** (चिटुकलेंपणानें) आपल्या आईना किंवा मिसेसना जरा वाहेर पाठवता कां ?

**जयंत :** अहो पण, आई येथें नसते. आणि मिसेस नाहीं आहे मला—अजून तरी नाहीं.

**मुलगी :** मग घरांत कुणी बाईमाणूस असेल नां ?

**जयंत :** बाईमाणूस ! छे, छे. मी एकटाच रहातो—इथं—या खोलींत.

**मुलगी :** असं होय ! (मुलगी त्याच्याकडे टक लावून पहात उभी राहते. तो गोंधळतो. त्याचें लक्ष हातांतल्या ब्रशकडे जाते. तो खाली ठेवतो आणि टॉवेलनें तोंडाला लावलेला फेस पुसतो) तर मग तुम्हांलाच सांगते मी. (पिशवी खाली ठेवते)

**जयंत :** मला सांगता ? काय मला सांगता ?

**मुलगी :** मी ब्रायटो सावणाची एजंट आहे. आमच्या सावणाची माहिती मी तुम्हांला सांगणार आहे.

**जयंत :** सावण ? अहो पण सावण नको आहे मला. म्हणजे एवढ्यांत. खूप सांठा करुन ठेवलाय मी घरांत. खरंच पुष्कळ सावण पडलाय. (तिला घालविण्यासाठीं उत्सुक झाला आहे) पण थँक्यू हं !

**मुलगी :** (हंसून) अहो तुम्हांला सावण विकणार नाही आहे मी. फक्त माहिती सांगणार आहे. आणि सँपल म्हणून एक डबा देणार आहे फुकट.

**जयंत :** अहो पण—

**मुलगी :** एक बादलीभर गार पाणी, आणि एखादा कपडा आणता कां ? शर्ट, टॉवेल कांहीहि चालेल.

**जयंत :** (धीर करुन) पण प्लीज—मला—मी—बाहेर जायचंय हो मला. मला आतां वेळ नाहीं. अगदी खरंच नाहीं.

**मुलगी :** पांच मिनिटं सुद्धां वेळ नाहीं का हो तुम्हांला ? जास्त वेळ नाहीं घेणार मी. आम्हांला दिवसाला पंचवीस घरं पुरी करावी लागतात. प्रत्येक ठिकाणी प्रात्यक्षिक करुन दाखवायचं. चोवीस घरं झालीं माझी. तुमचं हे पंचविसावं. तुम्हांला थोडी माहिती सांगितली कीं माझ्या वहींत मला तुमचं नांव नोंदविता येईल. नाहींतर मला पुढच्या आळींत जावं लागेल तेवढ्यासाठीं—पंचविसावं घर पुरं करायला.

**जयंत :** मग तुम्हीं माझं नांव लिहा नां तुमच्या वहीत दडपून. मला विचारलंच तर मी सांगेन, कीं हो, कपडे धुवायला मी तुमच्याकडून शिकलो म्हणून. चालेल ?

**मुलगी :** नाहीं चालणार ! माझ्या सद्सद्विवेक बुद्धीला नाहीं चालणार तें.

**जयंत :** अरे बापरे.

**मुलगी :** ज्या कंपनीचें मी महिन्याला पैसे घेते, त्या कंपनीशी इमान राखणं कर्तव्य समजतें मी माझं, ठीक आहे, येते मी (पिशवी उचलते)

**जयंत :** अहो थांबा, थांबा. मी आणतो वादलीभर–थंड पाणी (मुलगी पिशवी खाली ठेवतें)

**मुलगी :** आणि एक कपडा हं (जयंत आंत जातो)

**जयंत :** (बाहेर डोकावून) साबण नको नां ?

**मुलगी :** छे हो, त्याच्यासाठींच तर ही एवढी खटपट. (पिशवीतून वही, पेन्सिल, डबा आणि मोठा चमचा बाहेर काढते, आणि खूर्चीवर बसते. जयंत आंतून हेंदकळत एक वादलीभर पाणी घेऊन येतो. काखोटीला टॉवेल आहे. मुलीच्या खुर्चीसमोर उभा रहातो) हं, सांगा तुमचं पूर्ण नांव ? (त्याच्याकडें न पहातां लिहूं लागते)

**जयंत :** जयंत देशपांडे.

**मुलगी :** (वहित लिहित) बसा ना—

**जयंत :** थॅंक्स हं (बसतो)

**मुलगी :** फॅमिली मेंबर्स किती ? एकच नां ?

**जयंत :** हो.

**मुलगी :** काय करतां ?

**जयंत :** नोकरी. बॅंकेत असतो मी.

**मुलगी :** मासिक उत्पन्न ?

**जयंत :** आं ? अहो तुम्ही अगदी—

**मुलगी :** काय आहे तुमचं मासिक उत्पन्न ?

**जयंत :** चारशें.

**मुलगी :** धुण्याला कुठला साबण वापरता तुम्ही नेहमी ?

**जयंत :** अहो मी कधी साबणच वापरत नाही. माझं धुणं—

**मुलगी :** पण मघाशीं तर तुम्हीं म्हणालांत कीं साबणाचा वराच सांठा करुन ठेवलाय तुम्हीं घरांत—




**जयंत :** तें आपलं

**मुलगी :** मला घालविण्यासाठी ! पण हे पहा, यापुढे खरचं आमच्या कंपनीचा साबण वापरुन पहा तुम्ही. ... फार सुंदर असतो. कपडे टिकण्याच्या दृष्टीनें उत्तम. एकदां वापरलांत तर पुन्हा दुसऱ्या साबणाकडे पहाणार नाहीं तुम्हीं. पुष्कळ फेस असतो—

**जयंत :** आणि कपडे शुभ्र निघतात ?

**मुलगी :** (हंसून, कौतुकानं) तुम्हांला काय माहित ?

**जयंत :** ओळखलं आपलं मी.

**मुलगी :** बरं आतां कृती दाखवते मी हं (दोघे वादली उचलून समोरच्या टेबलावर ठेवतात) नीट पहा, वादलीभर थंड पाण्यांत शुभ्र चमकदार आणि मुलायम ब्रायटो साबणाचे दोन चमचे. घालायचे. एकदा ढवळल्यावर साबण विरघळून त्याचा असा पुष्कळ फेस होतो.

**जयंत :** फेस भराभरा उसळूं द्या—

**मुलगी :** मग त्यांत अलगद हातानें असा कपडा आंत सोडायचा. तो दोनदां वर खाली वुचकळून आंतल्या आंत खळवळायचा, मग पांच मिनिटं कपडा आंत भिजूं द्यायचा, म्हणजे तो स्वच्छ होण्याची क्रीया आंतल्या आंत घडते. (घड्याळ पाहते) पांच मिनिटं थांबायला पाहिजे. (दोघे बसतात. तो घड्याळ बघतो. मग दोघें एकमेकांकडे बघतात. आळीपाळीनें वादलीत डोकावून बघतात. दोघांना विलक्षण 'आक्वर्ड' झालं आहे)

**जयंत :** (डबा उचलून) ब्रायटो !

**मुलगी :** खूप पॉप्युलर व्हायला लागला आहे आमचा साबण आतां घरोघर. सुबक डबा, उत्कृष्ट साबण आणि हो, प्रत्येक डब्यांत लहानशी भेट असतें कांहींतरी (दबलेला गडगडांत). अगवाई, पावसाचं चिन्ह वाटायला लागलं आहे. (लगबगीनं दारापर्यंत जाऊन) खरंच कीं ! मला वाटंत आतां टॉवेल काढायला हरकत नाहीं.

**जयंत :** अहो, पण दोनच मिनिटं झाली.

**मुलगी :** पुरेत तेवढी हं, आतां कपडा बाहेर काढून असा घट्ट पिळायचा—अस्सा मग साध्या पाण्यांत खळवळून वाळत टाकायचा.

**जयंत :** आणूं कां साध्या पाण्याची वादली म्हणजे सगळं साग्रसंगीत होऊं द्या. (गडगडांत) नाहींतर मी धुवीन चालत असेल तर.

**मुलगी :** थॅंक्स हं. तसंच करा. पाहिलंत ना किती स्वच्छ निघाला तो.

**जयंत :** अहो पण मुळांतच मुळी मी तुम्हांला धोब्याकडून आलेला टॉवेल दिला होता.

**मुलगी :** म्हणजे ?








**जयंत** : स्वच्छ टॉवेलच दिला मी. तुम्हीं कांहीं म्हणाला नव्हतां कीं मळकाच पाहिजे म्हणून—

**मुलगी** : इतकं स्पष्ट करुन बोलावं लागेल असं वाटलं नव्हतं मला.

**जयंत** : सॉरी हं. खर सांगू, तुम्हांला मळका कपडा देण्याची कल्पना कशीशीच वाटली मला. कांहींतरी शिष्टाचार असतात कीं पण मुद्दा आला ध्यानांत माझ्या. दोन चमचे सावण, बादलीभर पाणी—

**मुलगी** : अगवाई आलाच पाऊस. पळते आतां मी–(दाराशी जाऊन) अय्या विसरलेच की, तुमचा सॅंपलचा डबा. आंत कांहींतरी भेट असेल हं—(पळते)

**जयंत** : सावणाची परी, आली माझ्या घरीं—(डबा उघडतो आंतून शिट्टी निघते. टॉवेलचा पिळा खांद्यावर घेतो व बादली उचलतो, तेवढयांत दारावर थाप) कोण आहे ? (मुलगी आंत येते) आ तुम्ही ?

**मुलगी** : छत्री आहे कां हो ? खूप पाऊस आहे बाहेर. उद्या करीन मी परत.

**जयंत** : छत्री नाहीं हो. रेनकोटपण नेला मित्रानं.

**मुलगी** : असं होय. बरं मग जाते तशीच.

**जयंत** : अहो थांबा तर. भिजत कुठं जाणार तुम्ही ? पाऊस थांबेपर्यंत आंत या नां. (ती संकोचून दारांतच उभी रहाते) अहो या ना. किती वेळ उभ्या रहाल दारांत ? (मुलगी बाहेर बघते) कमाल आहे, मघाशी वळेबळें आंत आलांत, आतां बोलावतो आहे तरी येत नाहीं.

**मुलगी** : (आंत येत) मघाची गोष्ट वेगळी होती.

**जयंत** : कशी काय ? मी तोच, तुम्ही त्याच —

**मुलगी** : मी तीच नाहीं. मघाशीं मी एक धीट सावण विक्रेती होतें. आतां . . . . .

**जयंत** : पावसांत सांपडलेली एक असहाय . . . अं . . . . . महिला. (खूर्चिकडे बोट दाखवून) बसा नां मी हा टॉवेल ठेऊन येतो (मुलगी खोलीत हिंडते. जयंत येतो. ती बसते. जयंत कपाटांतून मासिकाची चळत काढून तिच्यासमोर ठेवतो. सर्व मासिकें 'मसल बिल्डिंग वा ' स्ट्रेंग्थ'ची आहेत. त्यांच्या मुखपृष्ठावर दंडाचें स्नायु–फुगवून उभे असलेलें पहेलवान दिसतात. दोन तीन मासिकें पाहिल्यावर मुलगी मासिकें खालीं ठेवतें. तें पाहून) सॉरी हं. थांबा. ' स्त्री 'चा एखादा जुना अंक निघेल घरांत कुठे-तरी, गेल्या महिन्यांत आई रहायला आली होती माझी.

**मुलगी** : राहूं दे (तो बसतो. ती रुमाल काढून तोंड पुसते. मग तो रुमाल काढून तोंड पुसतो. थोडया वेळानें.)

**जयंत** पावसानं अगदी कमाल केली नाहीं ?

**मुलगी** हो नां, अगदी कमालच केली पावसानं (पुनः स्तब्धता)

**जयंत** : दूध नाहीं घरांत. नाहींतर चहा केला असता . .

**जयंत** : लाडू खाणार कां ? रव्याचा ?

**मुलगी** : नको. खरंच नको.

**जयंत** : अहो चांगला झालाय. आईनं धाडलाय माझ्या. आणतोच. (कपाटांतील लाडूंचा डबा काढतो.)

**मुलगी** इथं नसते तुमची आई ?

**जयंत** नाही नां. संगमनेरला असतात आईवडील. मी नोकरी निमित्त इकडे असतो. बॅंकेत हो, पण तें सगळं सांगितलं नाहीं कां मघाशीच तुम्हांला ? हे घ्या — (बाटींनं लाडू देतो)

**मुलगी** : छान झालाय हं (जयंत आनंदतो) आईवडील इथं नाहींत तुमचे, मग अगदी कंटाळा येत असेल नाहीं ?

**जयंत** येतो तर. फार एकलकोंडं वाटतं. आजच तुम्ही यायच्या आंत वडील येऊन गेले माझे. नाराज आहेत सध्या माझ्यावर. लग्न कर म्हणून मागे लागले आहेत. मुली पहा म्हणतात.

**मुलगी** : मग काय चुकलं हो त्यांचं ?

**जयंत** : अहो पण मी विरुद्ध आहे मुली पहाण्याच्या. आपलं लग्न आपणंच जमवायचं असं ठरवलं आहे मी. वडिलांच्या मतें ती धमक नाहीं माझ्या अंगांत. तसं खरं आहे हो त्यांचं म्हणणं – मी जरा शाय नेचरचाच आहे पहिल्या-पासून. मुलींपासून आपला चार हात दूरच असतो. पण मी काय म्हटलं की असेल लिहिलेलं नशिबांत तर एखादी मुलगी चालत येईल घरी आपणहून. (मुलीला ठसका लागतो. जयंत ओशाळतो). सॉरी हं ! पहा आपली ओळख ती काय, आणि मी तुम्हांला काय सांगत बसलो वेडयासारखं. माझा...म्हणजे... तसा कांहीं उद्देश नव्हता हं माझा. असं होतं नाहीं किती वेळां, अनोळखी माणसां-जवळ हृद्गत बोलून जातो आपण. आगगाडींत नाहीं कां, चार तासांच्या ओळखीत कित्येक वेळा अगदी जिवा-भावाच्या गोष्टी बोलतो आपण–पण तें जाऊं दे, तुमची मंडळी इथंच असतात ?

**मुलगी** मंडळी ? मंडळी म्हणजे फक्त आई आहे मला. कर्ता-सवरता वडील भाऊ गेला गेल्या वर्षी ..... म्हणून मी ही सावणाची कामगिरी पत्करली आहे. कॉलेज तर पुरं करायला पाहिजे. शेवटचंच वर्ष राहिलं आहे आतां. बी. ए. ची पदवी एकदां पदरांत पाडून घेतली कीं सुटले. मी बी. ए. व्हायची आई फार आतुरतेनं वाट पाहाते आहे.

**जयंत** सहाजिकच आहे. म्हणजे मग तुम्हांला ब्रायटोच्या बुडबुड्यांना कायमचा रामराम ठोकता येईल.

**मुलगी** असंच कांहीं नाहीं. दुसरं कांहींतरी चांगलं मिळाल्या-शिवाय ही दोनशें रुपयांची नोकरी कशी सोडून चालेल मला. ? दुसरी एखादी चांगली नोकरी किंवा . . . .

**जयंत** किंवा काय ?

मुलगी : कांहीं नाही.

जयंत : आवडतं कां हो तुम्हांला हे काम ?

मुलगी : आवडतं का नावडतं ! आतां त्याच्या पाठीकडे गेले आहे मी. माझ्या भूमिकेशी इतकी एकरुप झाले आहे कीं तिच्यावद्दल तटस्थपणानें विचारच करतां येत नाहीं मला....सुरवातीला झाला थोडा त्रास. दारोदार ही मोठी पिशवी घेऊन हिडायचं. वाटेंत वर्गातल्या मैत्रिणी भेटायच्या, कॉलेजांतील मुलं भेटायची, लाज वाटायची. तसं पाहिलं तर चांगल्या श्रीमंत घरांतल्या मुलीसुद्धां पॉकेटमनी मिळवायला गंमत म्हणून ही नोकरी करतात एक फॅशन आपली. पण तशी गरज नसल्यामुळें त्या बेफिकीर राहूं शकतात. लहर फिरली, दिली नोकरी सोडून. माझं तसं नाहीं. कितीहि वीट आला तरी सावणाची झोळी खालीं ठेवायची हिंमत नाहीं माझी. एकच मंत्र दारोदार म्हणत हिंडलं पाहिजे 'आमचा ब्रायटो सावण वापरुन पाहिलांत कां तुम्ही ? सुंदर, शुभ्र, मुलायम....हं ! पहिल्या, दुसऱ्या, तिसऱ्या आणि पंचविसाव्या घरींहि तीच रेकॉर्ड लावायची आणि प्रत्येक वेळा आपण अगदी प्रथम ही माहिती सांगतो आहोत अशा उत्साहानं वोलायचा अगदीं हंसतमुख चेहरा ठेवून... झोपेंतून मला कुणी हलवून जागं केलं नां, तरी मी लागलीच म्हणून दाखविन सगळा पाठ, अगदी घडाघडा.

जयंत : खरंच, शावास आहे तुमची. एका दिवसांत पंचवीस अनोळखी घरीं जायचं म्हणजे कमाल आहे हं. कल्पनेनेच माझ्या अंगावर कांटा उभा रहातो.

मुलगी : नुसतच जायचं असतं तर चाललं असतं. पण कुठे काय अनुभव येईल याची शाश्वती नसते नां. पंचवीस दारांच्या आड पंचवीस तऱ्हेचें अनुभव वाढून ठेवले असतात आमच्यासाठीं.

जयंत : असं ?

मुलगी : हो ना. कित्येक ठिकाणीं तर तोंडावरच धाडकन दार लावून घेतात आमच्या. अपमान पचविण्याची संवय करावी लागते.

जयंत : काय नीच असतात हो लोक .

मुलगी : कां वरं ? त्यांचं काय चुकतं ? कामाच्या, घाईच्या, वेळा असतात. नवऱ्याची ऑफिसांत जायची घाई; पोरांची शाळेंत जायची घाई. अशा वेळेला नवऱ्याला वाढायचं सोडून, पोरांचं डबे भरण्याचं सोडून आमचा सावणाचा सोहळा कोण पहात बसेल ?

जयंत : हो, तेहि खरंच.

मुलगी : एकदा एक वाई माझ्याशी वोलायला आली, तेवढ्यांत पोळी करपली तिची तव्यावर. (हंसून) अशी संतापली आहे म्हणतां....दुपारी गेलं तर वामकुक्षीची वेळा, संध्याकाळी कुणी सापडत नाहीं घरीं.

जयंत : सगळीकडेच येतो असा अनुभव ?

मुलगी : छे, छे, कित्येक ठिकाणीं तर जंगी स्वागत होतं आमचं. चहासुद्धां विचारतात. फुकट मिळणाऱ्या सॅंपलच्या डब्यासाठीं वरं; कांहीं पोक्त मंडळी या फुकट डब्याच्या बदल्यांत आम्हांला फुकट उपदेश करतात. मुली, कां तू अशी दारोदार हिंडतेस ? त्यापेक्षां, दुसरी एकादी नोकरी कां नाहीं धरत ? शाळेंत शिकवावं, शिवण शिवावं, लोणची मसाले करावे, एक ना दोन...खूप मासले बघायला मिळतात मनुष्य स्वभावाचें.

जयंत : आणि इतकं असून कधी वैतागत नाहीं तुम्ही ?

मुलगी : न वैतागायला काय झालं ? एका दिवशीं तर अंधारीच आली माझ्या डोळ्यासमोर. दुपारची वेळ होती. एका अनोळखी भागांतल्या इमारतींत अगदी वरच्या मजल्यावर गेले मी. दार ठोठावलं, तें एका इसमानं उघडलं. मी नेहमी प्रमाणें विचारलं, कुणी वाई माणूस आहेत कां घरांत ? तो इसम म्हणाला, वायकामाणसं सगळी आंतल्या खोलीत आहेत. मी आंत गेले त्याच्या मागोमाग, त्या बुवानं दारच लावून घेतलं, अशी किंचाळलें मी. मनांत देवाचा धांवा केला –

जयंत : मग आला तो धांवून ?

मुलगी : आला नां. पोस्टमनच्या वेषांत. दुपारची डाक घेऊन नेमका त्याच वेळेला देवासारखाच धावून आला तो. तेव्हांपासून धडा घेतला मी. (बसते. मांड्यांत पाणी ओतून पिऊं लागते. जयंत दारापर्यंत पोचला आहे. तो दाराच्या फळीला हात लावतो. मुलगी दचकून उभी उभी रहाते. जयंत दाराची एक मिटलेली फळी असते ती उघडतो.)

जयंत : एक विचारुं कां हो तुम्हांला ? मी सुद्धां एकटाच होतो कीं या खोलींत. मग तुम्ही आंत कशा आलांत ?

मुलगी : (हंसून) खरं सांगू कां ? आंतयेण्याआधीं दारांतूनच पारख केली मी तुमची. मनुष्य स्वभावाची पूर्ण माहिती आहे आतां मला. तुम्हांला पाहिल्यावरच मी म्हटलं की हा इसम अगदी —

जयंत : (खाली मान घालून) बावळट दिसतो. असंच नां ?

मुलगी : नाही हो, बावळट नाही, निरुपद्रवी...अय्या पाऊस थांबलाच कीं, लक्षच नाहीं गेलं माझं.

जयंत : माझं पण.

मुलगी : निघते मी आतां. थॅंक्स हं (दारापर्यंत जाते)

जयंत : अहो तुम्ही एवढी सगळी माहिती सांगितलीत, पण तुमचं नांव, तुमचा पत्ता, तो कुठं सांगितलांत ?

मुलगी : खरंच की. मंजु देव माझं नांव. रहाते मंगळवार पेठेत, गोंवळेकरांचा वाडा.

जयंत : आहे ठाऊक मला. माझी मावशी रहात असे तिथं पूर्वी.

मुलगी : मग या नां कधीतरी आमच्याकडे.

जयंत : उद्या येऊं ?

मुलगी : उद्यांच ? अं. वरं. या ना. येऊं मग ?

जयंत : तुम्हांला एक सांगायचें राहिलंच कीं (लाजतो) मी- मला तुम्ही. यापुढें तुमच्याच कंपनीचा सावण घ्यायचं ठरवलं आहे मी. अच्छा– (मुलगी जाते. जयंत सावणाचा डबा वादलींत रिकामा करतो. आनंदानें बेहोष होऊन वादलीत फेस करतो. गाऊं लागतो. तेवढ्यांत . . . .
(पडदा)

●●●







अनुक्रमणिका

# अंगें भिजली जलधारांनी

—पांडुरंग काळे

एक चित्र—विचित्र कथा....

*आमच्या गोडबोलेंना काढायचा आहे एक शिनेमा. व त्यासाठीं प्रेक्षकांना पागल करून पैशाचा पाऊस पाडणारे कथानक सांपडले किशाभाऊ चोरगेंना....बस्—झाली चित्रपट-निर्मिती अन् पिक्चर पण लागला....पण—त्याच दिवशी अस्सा पाऊस पडला कीं काय विचारता........!*

**अंधेरी** स्टुडिओतील चेतना चित्रचे ऑफीस आज वरेच गजबजले होते. निर्माते शरद गोडबोले-बाबुराव गवळी, दिग्दर्शक मास्टर नरेश, कथालेखक किशाभाऊ चोरगे, पटकथाकार शांता (राम) भोळे व सहाय्यक तंत्रज्ञ मंडळी जमली होती. एका नव्या कथेवर चित्रपट काढावयाचा होता व त्यावर चर्चा करून रुपरेषा ठरवायची होती. प्रेक्षकांना पागल करून पैशाचा पाऊस पाडणारे कथानक किशाभाऊ चोरगेना सांपडले होते. मूळ कथानक तसे जुनेच होते. शूद्रक कवींच्या मूळ संस्कृत मृच्छकटिकाच्या, देवलांनी केलेल्या भाषांतरीत नाटकावर चित्रपट काढल्यास चित्रपटाला कीर्ति मिळेल व पैशाचा पाऊस पडेल अशी किशाभाऊ चोरगे यांनी कल्पना सुचविली होती. व चित्रपटाला हवा तो मालमसाला यात किती ठासून भरलाय हे ते मोठ्या आकर्षक शब्दांत सांगत होते.

"मुच्चकटींग म्हंजी— मिशा काडणं का काय ?" चित्रपटाला निम्मे भांडवल दिलेल्या बाबुराव गवळीनी कुतूहलाने प्रश्न केला. सगळ्या ऑफिसमध्ये एकच हंशा पिकला. निर्माते बाबुराव गवळी चेहरा उतरवून आळीपाळीने सगळ्याकडे पाहू लागले. निर्मितीप्रमुख शरद गोडबोले यांच्या लक्षांत ही गोष्ट येताच ते म्हणाले, "याला म्हणतात विनोद ! ऐकलं का भोळे, बाबुरावनी किती सुंदर विनोद केला !" "बाबुरावनी विनोद केला मग मला कसा ऐकायला आला नाही ?" भोळेनी आश्चर्याने प्रश्न केला. भोळेना गप्प राहण्याची खूण करीत बाबुरावना उद्देशून ते म्हणाले, " भोळेना कानांनी जरा कमी ऐकू येतय नाहींतर तुमचा विनोद नक्की कळला असता त्यांना !"

"बाबुरावांचा विनोद म्हणजे काय ! बाबुराव अत्र्यांचाच विनोद तो ! किशाभाऊ चोरगेनी गोडबोलेच्या म्हणण्याला पुस्ती जोडली.

"आपला मूळ मुद्दा बाजूलाच राहिला. चित्रपट कथेबद्दल आपलं बोलणं चाललं होतं !" दिग्दर्शक मास्टर नरेश यांनी सगळ्यांना मुद्यावर आणलं.

"चित्रपटाला कथा बरी आहे. पण त्यांत बरेच बदल करावे लागतील. तसेच चित्रपटाच्या दृष्टीने कांहीं मालमसाला घालावा लागेल." निर्मिती प्रमुख गोडबोले यांनी चित्रकथेबद्दल आपले मत दर्शविलें.

"पयल्यांदा त्ये नांव बदल वरं, मुच्चकटिंग म्हंजी काय ती देवाला ठावं !" आपल्या अज्ञानाची बाबुरावनी प्रांजल कबुली दिली.

"आपल्या चित्रकथेंत पावसाचा सीन आहे तेव्हां बरसात हे नांव द्यावं !" कुणीतरी पण ते अगोदरच आपल्या चित्रपटाला देऊन राजकपूरने घोटाळा केला ना !" शिगारेटची राख झटकीत निर्माते गोडबोलेनी चित्रपटाचे नांवहि झटकले ! "लांबलचक नांवाशिवाय मराठी चित्रपटाला शोभा नाही आणि त्यांत चित्रपटाचे नांव काव्यमय असेल तर दुधांत साखर ! अंगे भिजलीं जलधारांनीं हे नांव आपल्या चित्रपटाला योग्य आहे." पटकथाकार शांता (राम) भोळेनी कल्पना सुचविली व चित्रपटाला नांव सुचविले. "नांव ठीक आहे ती सगळ्यांना पसंत पडली. चित्रपटाला 'अंगें भिजली जलधारांनी' हे नांव नक्की झाले.

"चारुदत्त, वसंतसेना, शकार – ही नांवे आपल्याला पसंत नाहीत त्या ऐवजी चारुकुमार, वसंतकुमारी, शेखर अशीं नांवें हवीत "दिग्दर्शक मा. नरेश यांनी बदल सुचविला. पण कथाकार चोरगेना तो पटला नाही. उसळून ते म्हणाले, "अहो ही नांव शुद्रक कवींची, देवलांची आहेत ती आपणास कशी बदलता येतील !"

"कां काय हरकत हाय ?"—बाबुराव गवळी.

"हो, पाहिजे तर पैसे देऊ आपण त्यांना" निर्माते गोडबोले.

"बोलवून आणा कुठं आहेत ते !" दिग्दर्शक नरेश.

"कुणाला ?" आश्चर्याने चोरग्यानी प्रश्न केला.

"कोण तें देवल आहेत त्यांना"– निर्माते गोडबोले.

"अहो पण ते इथं आहे कुठं ?"

"मग कुठं आहेत ?"

"स्वर्गात !"

"मग तर लई वेस झालं ! आपुन काई जरी केलं तरी कोन येणार हाय ईचारायला ?"– वाबुराव गवळी.

"त्यांचे नातेवाईक ?" — मोळे.

"न्हाईतर किशामाऊ तुमी आसं करा ही इस्टोरी इक्ती वदला की कुणाला वी कळायचं न्हाई ही दुसऱ्याची हाय –" गवळी

"असलं पाप माझ्या हातून या जन्मांत होणार नाही !" उसळून चोरगे बोलले.

"हे बघा चोरगे," निर्माते गोडबोले उपदेशपर स्वरांत बोलू लागले." आम्ही सांगतो तेवढं तुम्ही करा ! पुढची सगळी जबाबदारी आमची. आम्ही आणि देवलांचे नातेवाईक बघून घेऊ ! शांताराम बापू पुढं वाचा –"

"आपल्या नव यौवनाने वहरलेली लावण्य लतिका वसंतसेना जंगली चित्रपटांतील साईरा-बानू प्रमाणे पुढें पळते आहे." पटकथाकार शांता (राम) मोळे वाचू लागले. "पळतां पळतां ती पडते. उठून परत पळू लागते. शकार तिला गाठतो व तिच्या अंगावरचा शेला ओढतो.– सेक्स अपील ! शकार-वीट चेट यांना वसंतसेना चकविते व चारुदत्ताच्या घरांत घुसते. चारुदत्त देवपूजा करीत असतो. त्याला वसंतसेना दिसते. दोन मिनिटं दोघांच्या डोळ्यांची चमत्कारिक हालचाल." "वा-वा- छान झालीय सुरवात !"— गोडबोले.

"आपल्या ह्या सिन्मांत लावन्या फाईजित ! लावनी बिगर सिन्माला सोबा न्हाई" वाबूराव गवळीनी उपयुक्त सूचना केली.

"चेत्याच्या तोंडी दोन लावण्या आहेत"– मोळे

"वसंतसेनेच्या तोंडी चार पांच घाला"- निर्माते.

"वसंतसेनेच्या ?"– चोरग्यानीं आश्चर्याने विचारले.

"काय हरकत आहे ?" दिग्दर्शक मा. नरेशनी विचारले. "वसंतसेना ही नायकिणीचीच मुलगी होती ना ? मग तिला लावणी म्हणायला काय हरकत आहे ? नव्हे कां म्हणू नये"

"लावन्या संग डचान्स वी घाला–" गवळी.

"घालू– डान्सहि घालू ! पुढं– वाचा ! – दिग्दर्शक.

"वसंतसेना गवतावर पहुडली आहे. गवताची काडी ती चावते आहे. इतक्यांत विरह गीत असलेला चारुदत्त तिला दिसतो. व लगेच ती 'घर आया मेरा परदेशी' सारखं गाणं म्हणते.— यावेळी आवारा– चित्रपटांतल्या प्रमाणें धूर दाखवा."

"दाखवू !"

"घर आया मेरा परदेशी" हें हिंदी गाणं आहे."

"आपले कवि करतील मराठी गाणं !" निर्माते.

"हो–हो त्यांत काय ! 'घरी आला माझा परदेशी.' कसंकाय पद ?" — कवि.

"फारच अप्रतिम !"— निर्माते गोडबोले.

"चित्रपटांत स्टंट पाहिजे बुवा ! वाबुराव भगवानचा जमाना नाहिसा झाला तरी लोकांची स्टंट पाहण्याची हौस अद्याप कायम आहे." कोणीतरी सूचना केली.

"त्या दृष्टीने कथेत बदल करावा"— निर्माते.

"मग असा प्रसंग घालावा–" पटकथाकार मोळे सांगू लागले," वसंतसेना रमण्यासाठीं पुष्पकरंडक जिर्णोद्यानांत जाते. तेथें शकार तिची टिंगल करतो. तोच चारुदत्त येतो. दोघांची खूप मारामारी होते. शेवटी (नेहमी प्रमाणें) शकार पळून जातो. वसंतसेना चारुदत्ताला बिलगते."

"सूचना विचार करण्यासारखीं आहे–" निर्माते बोलले. "पावसाच्या सीनचे दृष्य तर फार परिणामकारक वठलं पाहिजे वरं का वगळे !" दिग्दर्शक नरेश गंभीरपणे म्हणाले "आपल्या चित्रपटांचं ते प्रमुख आकर्षण आहे. वसंतसेना ओलिचिंब झाली आहे, तिचे अंग प्रत्यंग दिसत आहे. ती चारुदत्ताला बिलगते.— प्रेक्षक वेडे झाले पाहिजेत."

"त्याची तुम्ही काळजीच सोडा हो !" शिगरेट तोंडांतून न काढता कॅमेरामन वगळे हंसून उत्तरले," तुमच्या हिरॉइनची तयारी ठेवा म्हणजे झालं. आपली महिनाभर एकच शॉट घेण्याची तयारी आहे."

"वसंतसेनेच्या कामाला एखादी नवोदित नटी घ्यावी – तिच्या कांहीं अटी नसतात. आणि तिची कशालाहि ना नसते." दिग्दर्शक नरेशनी सूचना केली.

"एक दोन मुली आहेत माझ्या पहाण्यांत !' पण ते नंतर ठरवू !" निर्मात्यांनी विषयाला वगल दिली.

"चित्रपटाचा शेवट मात्र फारच परिणामकारक आहे." पटकथाकार शांताराम सांगू लागले." पुष्प करंडक जिर्णोद्यानांत चारुदत्ताने वसंतसेनेचा खून केला अशी फिर्याद शकार न्यायालयांत करतो. चौकशी

(पान ३६ वर पहा)



भयंकर फास्ट बोलर आहे . . . लांबचा स्टार्ट घ्यायला गेलाय दूरवर . . . !

एक अराजकीय त्रिविक्रमी इचार—

# त्रिविक्रमाचें बेकारी निवारण





*आज सुशिक्षित बेकारी इतकी वाढली आहे कीं आमच्या त्रिविक्रमाला त्याचा विचार करावाच लागला....त्यावर त्यांनी एक प्रबंध लिहिला, व्याख्याने दिली.... आणि त्यांनी तरुणांना आव्हानाहि केले....! पाहूं या कोण स्वीकारतं ते....!*

—चन्द्रकान्त इन्दापूरकर

**सकाळची** वेळ होती गॅलरींत उभा राहून त्रिविक्रम कोंवळ्या उन्हाचा आनंद घेत होता. रस्त्यावरून एक आंधळा आंधळ्याला एक पैसा दे भगवान अशी किंकाळी फोडीत भ्रमण करीत होता. तेवढ्यांत आंतून चंपाची दुसरी किंकाळी त्रिविक्रमाच्या कानांवर पडली. 'अहो, नुस्ते शंभासारखे उभे काय राहतां ? जरा मदत करा कीं'

'अग हो ! हो ! हो !'

'हो ! हो ! हो ! काय करतां ? हें एवढं त्या आंधळ्याला घाला.' शिळ्या पोळ्यांनीं भरलेलें पातलें आपटत चंपा म्हणाली.

'जी सरकार !'

'उगीच पाचकळपणा करूं नका. जा आधीं, मला भांडी घासायचीं आहेत अजून.'

पोळ्यांची चवड त्रिविक्रमानें त्या आंधळ्याच्या झोळींत ओतली. तेव्हां तो म्हणाला, काय साब फक्त पोळ्याच आणल्या होय ? जरा भाजी, चटणी, डाळ कांहीं आणायचें कीं नाहीं ?'

'आंऽऽ ! काय म्हणतोस ?' त्याच्या मागणीमुळें स्तंभित होऊन त्रिविक्रम त्याच्याकडे पाहूं लागला. त्यावर, त्याला आश्चर्याचा दुसरा धक्का बसला. 'अरे, तूं तर चांगला डोळस दिसतोस कीं.'

'होय साहेब !'

मग "आंधळ्याला एक पैसा"... म्हणून कां कोकलतोस रे ?

'ती कवितेंतली ओळ आहे, साहेब.. काव्यांतलें सत्य लौकिक सत्यापेक्षां भिन्न असतें.'

'अरे वा ! तूं तर मला मोठा पंडित दिसतोस !'

'पंडित कांहीं नाहीं.' पण बी. ए. (मराठी ऑनर्स) फेल आहे.'

'काय, म्हणतोस तरी काय ? मग नोकरी बिकरी कां नाहीं करत ?

'हा राजासारखा धंदा सोडून नोकरी कोण करील साहेब ?' असं म्हणून हंसत हंसत तो भिकारी, दूर निघून गेला. कितीतरी वेळ त्या डोळस आंधळ्याकडे पाहत त्रिविक्रम उभा होता. मग एकाएकीं त्याला हंसू आलें. आनंदाचा झटका आला. हातांतलें पातेलें डफासारखें वाजवीत नाचत नाचत तो वर आला" अहो वेडबीड लागलं कीं काय ?"

चंपा खेंकसली.

"हां वेडच ! पण त्या आर्किमिडीजसारखें. बस् ! भारताच्या बेकारीवर खरा उपाय सांपडला. हाच तो खरा धंदा ! 'ॐ भिक्षां देहि !"

"काय बरळतां मूर्खासारखें ?"

"तुला नाहीं कळायचें इतक्यांत ! पण जेजें भारतांतल्या महान् अर्थशास्त्रज्ञांना व थोर नेत्यांना कळलें नाहीं, तेथें तुला तरी काय समजणार ?"

थोड्याच दिवसांत त्रिविक्रमानें आपला बेकारी निवारणावरील प्रबंध प्रसिद्ध केला. त्याच्या सर्व मौलिक लिखाणाप्रमाणें ह्या ग्रंथानेंहि भारतांत खळबळ उडवून दिली. भिकाऱ्याचा धंदा हा एक मानाचा धंदा आहे. त्याचा स्वीकार सर्वांनीं, विशेषतः सुशिक्षित बेकारांनीं अवश्य केला पाहिजे. त्यामुळें भारतांतील बेकारीची समस्या सहज सुटेल, अशा प्रकारचा एक महत्त्वाचा सिद्धांत त्रिविक्रमानें त्यांत मांडला तो वाचून अनेक थोर अर्थ शास्त्रज्ञांनीं आपल्या माना खालतीं घातल्या. मोठमोठ्या विचारवंतांना आपल्या बुद्धीचें दारिन्द्य समजून आलें व राज्य धुरंधर त्या प्रबंधाचा सखोल अभ्यास करूं लागले. आज ना उद्यां त्यांतील कल्पना प्रत्यक्षांत आल्यावाचून राहणार नाहींत. यामुळें ह्या प्रबंधांतील कांहीं महत्त्वाच्या कल्पना जाणून घेणें आवश्यक व उद्बोधक ठरेल.

या ग्रंथावर पहिला आक्षेप कोणता येणार तें त्रिविक्रम ओळखून आहे. नटवेपणानें मिरविणाऱ्या व डामडौलानें राहणाऱ्या उच्च मध्यमवर्गीयांना याचा स्वीकार करतांना मानहानि वाटणारच. नाक








उडवीत हे लोक म्हणणार, 'शी : शी : ! हा हो कसला धंदा ?' पण ह्या आक्षेपकांना त्रिविक्रमानें बिनतोड उत्तर दिलें आहे. त्यांच्या मतानें हा धंदा स्वीकारण्यांत मानहानि तर बिलकुलच नाहीं. उलट आपल्या पूर्वजांनीं मुंजीसारख्या आवश्यक धार्मिक विधीत भिक्षा मागण्यास महत्वाचें स्थान दिलें आहे. प्राचीन काळीं मुंजी ह्या विशिष्ट जातीपुरत्या व फक्त पुरुषांपुरत्याच मर्यादित नव्हत्या. उलट सर्व जातीच्या स्त्रीपुरुषांना हा विधि सक्तीनें करावा लागे. ह्याचाच अर्थ असा कीं आमच्या थोर मुनींनीं ह्या थोर धंद्याची थोरवी आधींपासून जाणली होती. भारतासारखा पुत्रपौत्रांनी संपन्न असलेला देश भिक्षां देहिशिवाय कधींच जिवंत राहूं शकणार नाहीं, ह्याची त्यांना पूर्ण जाणीव होती. काळाचे पडदे ओलांडून भविष्याकडे सहजं पाहण्याची कुशाग्र दूरदृष्टि त्यांना होती. म्हणूनच 'भिक्षा मांगा ! याचक बना !' असा दिव्य संदेश त्यांनीं दिला. आम्ही मात्र तो पाश्चात्यांच्या संगतीनें विसरलों. कुणी मजूर होऊं लागेल. कुणी खर्डेघाशी करूं लागेल. कुणी लेफ्ट-राइट करूं लागेल. पण आपल्या भूमींतच निर्माण झालेला आपला परंपरागत आलेला हा भिकाऱ्याचा धंदा कोणाच्याच लक्षांत राहीना. आम्ही भिक्षेला मुकलों. भुकेकंगाल झालों. विस्मृतीमुळें आमची अधोगति झाली.

अर्वाचीन काळांतहि मोठमोठ्या लोकांनी ह्या धंद्याचा अवलंब केला व मोठमोठालीं कार्यें केलीं. पं. मालवीय स्वतःला एक भिक्षेकरी म्हणून घेत, तीच गोष्ट महर्षि कर्वे व महात्मा गांधी ह्यांची. ह्या दरिद्री देशाची सेवा करायची तर भिक्षा ही मागितलीच पाहिजे असा त्यांचा दंडक होता. आज विनोबा काय करीत आहेत ? जमिनीची भिक्षाच मागत आहेत ना ? मग आम्ही तरी या बाबतींत मागें कां रहावें ? आमच्यासाठीं महान् नेते भिक्षा मागतात तर स्वतःसाठीं आपण भिक्षा कां मागूं नये ? त्रिविक्रमाचा असा रोकडा सवाल आहे. भिक्षा मागणें, त्यांच्या मतानें फार मोठें राष्ट्रीय कार्य आहे. बेकार राहून अनेक तरुण माशा मारीत वेळ घालवतात, वडलांच्या जिवावर मजा करतात. हें त्रिविक्रमाला बिलकुल पसंत नाहीं.. "अरे," तो अशा नामर्दांना चिडून विचारतो, "तुम्ही भिक्षा मागायला घाबरतां का ? शेवटीं राष्ट्र राष्ट्र म्हणजे तरी काय ? तुम्ही नागरिकच ना ? मग त्यांनीं जिवंत नको राहयाला ? कां ते मेल्यावर राष्ट्र तग धरणार आहे ? या, असे पुढें या. हातांत भिक्षेची झोळी घ्या. उच्च स्वरांत गर्जना करा, 'राष्ट्राला तारण्यासाठीं, आम्हांला भिक्षा घाला' मान ताठ करून, छाती पुढें करून भिक्षा घ्या. स्वतः जगा व राष्ट्राला जगवा. उगीच मोठमोठाल्या स्वप्नमय नोकऱ्यांची आशा धरीत आपलें जीवन व्यर्थ घालवूं नका. झोळी घ्या व भिक्षा मागा. तो आपला परंपरागत राष्ट्रीय धंदा आहे."

या धंद्याचें वैशिष्ट्य असें आहे कीं ह्यांत बेकारीला जागाच नाहीं. कितीहि लोक ह्यांत घुसले तरी त्या सर्वांना सहज हंसत, खेळत काम फक्त ह्याच धंद्यांत मिळूं शकते. बरें पदव्यांची किंवा वयाची येथें अट नाहीं पोरगं तीन वर्षांचं होऊन जरा चालूं बोलूं लागलं कीं स्वतंत्रपणें हा धंदा करूं शकतें. एक तें तीन वर्षांपर्यंत कांहीं समजत नसतांहि आईबापाच्या धंद्याला तें हातभार लावूं शकते. सारांश एक महिन्याच्या केंकाटणाऱ्या कारट्यापासून तो शंभर वर्षांच्या गलितगात्र वृद्धापर्यंत प्रत्येकाला मानानें स्वतंत्र स्थान ह्याच एकमेव धंद्यांत आहे. स्त्री असो कीं पुरुष असो, धडधाकट असो कीं आसन्नमरण असो, अस्पृश्य असो कीं ब्राह्मण असो, सर्वांना समान पातळीवरून वागविणारा हाच काय तो एकच एक राष्ट्रीय धंदा आहे. कुटुंबाच्या कुटुंबाला कोणतेंहि प्राथमिक शिक्षण न घेतां करण्याजोगा फक्त हाच धंदा आहे. आईबापांच्या प्रेमळ नजरेखाली पोरगा एकाच वेळीं शिकूं शकतो व मिळवूंहि लागतो, काम करीत तो शिकतो व शिकत शिकत जीवन निर्वाह करतो Learning by doing.. व Earning while learning ह्या दोन्ही समस्या एकाच वेळीं फक्त ह्याच धंद्यांत सोडविल्या जातात. या दृष्टीनें शैक्षणिक व आर्थिक क्षेत्रांत नवीन मन्वंतर सुरू करणारा हाच धंदा आहे असें त्रिविक्रमाचें मत आहे.

सरकारच्या दृष्टीनें हा धंदा फारच फायदेशीर ठरण्यासारखा आहे. भले मोठें नियोजन करा रे, पैसा व साधनसामुग्री ह्यांची जुळवाजुळव करा रे—अशा फंदांत मुळीं बिलकूल पडावें लागणार नाहीं. परत मालक—मजूर तंट्यासारखी प्रकरणें कधींच उद्भवणार नाहींत. सारांश सरकारला ह्या धंद्यासाठीं भांडवल पुरवायला नको कीं तंटे सोडवायला नको. फक्त भिकारी हे न्यायाधीश, विधान-सभेचे सदस्य, डॉक्टर, वकील इत्यादिकांप्रमाणेंच देशाचे सभ्य व सन्माननीय नागरिक आहेत हे कबूल केलें कीं बस् ! त्यांचा धंदा हा राष्ट्रीय धंदा म्हणून मान्य केलें कीं संपलें सरकारचें काम.



हां हां म्हणतां हजारो सुशिक्षित बेकार ह्याकडे धांव घेतील. आपल्या व आपल्या वाढत्या कुटुंबाच्या जीवननिर्वाहाची समस्या सोडवतील. भारतांत कोणी बेकार म्हणून मग दिसणार नाहीं. रस्तोरस्ती, गल्लोगल्लीं हातांत झोळी घेतलेले देशवीर भिक्षेकरी दृष्टीस पडतील. त्यांची पाऊलें गंभीरपणें पडत असतील. चेहऱ्यावर आत्मसमाधानाचें तेज फांकलेले असेल. मुखांतून तेजस्वी शब्द बाहेर पडत असतील–"भिक्षा मागणें हा आमचा राष्ट्रीय हक्क आहे व ती देणें ही तुमची नैतिक जबाबदारी आहे."

आणखी एक महत्त्वाची राष्ट्रीय समस्या ह्या धंद्याच्या प्रसारामुळें सुटूं शकेल. ती म्हणजे अन्नधान्याची समस्या. आजपर्यंत हा विकट समस्येनें अनेक अन्नमंत्र्यांचें भक्षण केलें पण ती स्वतःमात्र अजून बुभुक्षितच राहिली. त्रिविक्रमाच्या मताने ह्या धंद्याच्या प्रसाराबरोबर ही समस्या चुटकीनें सुटूं शकेल. स्वातंत्र्य प्राप्तीनंतर आपल्या देशांत अन्नोत्पादन कितीतरी पटीनें वाढलें. यासाठीं किती मंत्र्यांनीं किती व्याख्यानें दिलीं ! हातहात लांबीची किती पत्रकें छापलीं ! अधिक धान्य पिकवा, जपानी शेती पद्धति अवलंबा–या सारख्या मोहीमा आठवड्या–आठवड्याला काढल्या ! हे सारे प्रयत्न, कष्ट फुकटच गेले काय ? त्रिविक्रमाने अनेक सरकारी पत्रकांच्या व आंकड्यांच्या आधारें सिद्ध करून दाखविलें आहे कीं आमचें अन्नोत्पादन आम्हांला पुरेसे आहे. मग अजून अन्नधान्याची टंचाई कां भासते ? याला कारण आमचें पिकलेलें अन्न वायां जाते, वेस्ट होते–त्रिविक्रम चिडून म्हणतो. जरुरीपेक्षां अधिक धान्य घेतों, शिजवतों व शिळें राहिलें म्हणून फेंकून देतो किंवा जनावरांना घालतों अनेक श्रीमंत लोकांनी त्रिविक्रमापाशीं तक्रार केली कीं त्यांच्या घरचे शिळे अन्न हे माजूरी भिकारीहि घेत नाहींत. मोठ्या उर्मटपणें वर ते म्हणतात, कीं, असले बुरा लागलेले अन्न खायला आम्ही काय जनावरं आहोंत काय ? जरा कुठं थोडासा बुरा लागला किंवा किंचित् वास येऊं लागला तरी अन्नासारखें परब्रह्म लाथाडावयाचें काय ? त्रिविक्रमाच्या मतानें अन्न हें खरोखरच परब्रह्म आहे. मग ते खराब कसें होईल ? आपले जिभेचे चोचले वाढतात म्हणून आपणांस तें विटकें नाहींतर नासलेले वाटतें. वास्तविक अन्न कधींच नासत नाहीं, विटकें होत नाहीं कीं खराब होत नाहीं. आम्ही लोक त्याला विटकें किंवा कुजकट समजतों अन् तें फेकून देतो, हजारों मग धान्याचा अशा प्रकारे अपव्यय होतो. धान्यापरी धान्य वायां जातें व आम्ही अर्धपोटी आहोंत ते आहोंतच ही परिस्थिति त्रिविक्रमाला बदलून टाकावयाची आहे. अन्नाचा प्रत्येक कण कावळ्यांप्रमाणें उचलणारे देशभक्त भिकारी त्याला निर्माण करावयाचे आहेत. आमच्या ह्या देशभक्त याचकांच्या पलटणी तयार झाल्या की थोडेसें धान्य म्हणून फुकट जाणार नाहीं, त्रिविक्रम अभिमानानें अनेकदां म्हणतो. लक्षावधी लोक केवळ भिकवड आरामशीरपणें जगूं शकतील. देशाला हैराण करणारी अन्नधान्याची समस्या चुटकीसारखीं सुटून जाईल.'

सरकारप्रमाणेंच जनतेचाहि या योजनेमुळें अपरिमित फायदा होईल, अशी त्रिविक्रमाची पूर्ण खात्री आहे. आजकाल आमच्या नागरिकांत दिसून येणारा मोठा दोष म्हणजे त्यांचें शारीरिक दुर्बल्य–सुदृढ, हंसमुख, धष्टपुष्ट जवान फारच थोडे सांपडतात याला कारण आमचें ऐषरामी जीवन. व्यायाम म्हणून करायला नको, हातपाय कांही हलवायला नको. आमचा आजचा सारा संसार टेबला खुर्च्यांवरचा व गाद्यातक्क्यावरचा झाला आहे. मग आमच्यांत शारीरिक सामर्थ्य येणार कोठून ? त्रिविक्रमाच्या ह्या रोखठोक सवालांत कांहीं चूक आहे असें म्हणतां यावयाचें नाहीं. पण केवळ चूक दाखवून स्वस्थ बसणें हा त्रिविक्रमाचा स्वभावधर्म नाहीं. विघातकापेक्षां विधायक कार्याकडे त्याची दृष्टी जास्त लागलेली असते. आपला भिकाऱ्याचा पेशा जो स्वीकारील तो काडी पैलवान म्हणून कधीं राहणार नाहीं, असें त्रिविक्रम छातीठोकपणें सांगतो रोज तीन चार मैलांची सकाळ सायंकाळ रपेटच करावी लागते

**Statement about ownership and other particulars about newspaper 'Dipavali' Monthly**
**FORM IV (SEE RULE 8)**

| | | |
|---|---|---|
| 1. | Place of publication... | Dalal Art Studio,<br>42, Kennedy Bridge, Bombay—4. |
| 2. | Periodicity... | Monthly, on 1st of every month. |
| 3. | Printers' Name...<br>Nationality...<br>Address... | Shri Dinanath Damodar Dalal.<br>Indian.<br>42, Kennedy Bridge, Bombay—4. |
| 4. | Publishers' Name, Nationality and Address... | As per 3 above. |
| 5. | Editor's Name, Nationality and Address... | As per 3 above. |
| 6. | Names and addresses of individuals who own the newspaper and partners or share-holders holding more than one percent of the total capital. | Shri Dinanath D. Dalal,<br>Sole proprietor.<br>No partners or Shareholders. |

I, Dinanath Damodar Dalal, hereby declare that the particulars given above are true to the best of my knowledge and belief.

Date 20-2-1964.

D. D. Dalal,
Signature of publisher.

अनुक्रमणिका







या धंद्यांत मग ह्याहून अधिक दुसरा कोणता चांगला व्यायाम पाहिजे ? वरं ह्या रोजगारांनंतर चांगलं विविध प्रकारचें मुबलक भोजन मिळतें. आहारशास्त्रज्ञांनीं सांगितलेला चौरस आहार फक्त भिकारी काय तो रोज मिळवूं शकतो. पाकशास्त्रज्ञांनी वर्णिलेलें षड्रस भोजन हाच पठ्ठ्या रोज खाऊं शकतो. भरपूर व्यायाम व यथेच्छ चौरस आहार मिळण्याचे भाग्य फक्त ह्या भिक्षेकऱ्यांचेंच मग कां बरे हा पेशा आपण स्वीकारूं नये ? त्रिविक्रमानें आंकडे देऊन सिद्ध केलें आहे कीं हा पेशा जर आम्ही स्वीकारला तर आमचे सरासरी वजन १५० च्या पुढें जाईल सरासरी आयुष्यहि ७५ सहज होईल.

याशिवाय अनेक गोष्टींचें अप्रत्यक्ष शिक्षण आमच्या नागरिकांस मिळेल. श्रमप्रतिष्ठेचें बीज ह्याच धंद्यामुळें रोवलें जाईल. रोज घरोघरीं झोळी पुढें करावी लागणार असल्यानें मानसन्मानाच्या खोट्या कल्पना मूळांतूनच उखडून टाकल्या जातील. कोणतेंहि काम करण्याची आपणाला लाज न वाटली पाहिजे हें तत्त्व किती सहजासहजी आमच्या गळीं मग उतरेल ! तोंड वेंगाडण्याच्या कलेंत लहानपणापासूनच आम्ही पारंगत होऊं. पुढें पोरीचें लग्न जमवतांना, नापास चिरंजीवानं वर चढवावें म्हणून विनंती करतांना, सरकारी अधिकाऱ्यांपासून आपलीं कामें करवून घेतांना ह्या कलाप्रविणतेचा किती तरी फायदा होईल. संगीताचें शिक्षणहि प्रत्येक नागरिकास स्वाभाविक रीत्या मिळेल. त्यामध्येंच नृत्य आणलें तर भिक्षा अधिक मिळू शकेल. संगीत नृत्य प्रधान भिक्षेच्या फेऱ्या अधिकाधिक निघूं लागल्या तर आमच्या संगीत दिग्दर्शकांना नवीन चालींसाठीं व नृत्यदिग्दर्शकांना नवीन नृत्यासाठीं जिवाचा आटापीटा करावा लागणार नाहीं. गांवांतून एक चक्कर मारली तरी त्यांना बालगंधर्व व उदयशंकर ह्यांचे थवेच्या थवे भेटल्यावाचून राहणार नाहीत.

अशा प्रकारच्या ह्या महान् राष्ट्रीय धंद्याकडे सरकारचें अद्याप लक्ष गेलें नाहीं, याबद्दल त्रिविक्रमास सखेद आश्चर्य वाटतें. आतां तरी याकडे लक्ष देऊन या धंद्याचें राष्ट्रीयकरण करावें अशी त्यानें सूचना केली आहे. सुशिक्षित बेकारांना या धंद्यांत शिरण्यास सर्वतोपरि प्रोत्साहन द्यावें, अधिकृत भिकाऱ्यांची लायसेन्स काढावींत व एम्प्लॉयमेंट एक्स्चेंजमार्फत ह्यांची भरती व्हावी अशी त्रिविक्रमाची योजना आहे. भिकाऱ्यांना आपापसांत संघर्ष होऊं नये म्हणून त्यांना गांवें, गल्ल्या वाटून द्याव्यांत आणि एका ठिकाणीं दोन वर्षं काढली कीं सरकारनें स्वखर्चानें दुसऱ्या गांवीं त्यांना हें राष्ट्रीय कार्य करण्यास न्यावें असें त्यांचें मत आहे. कारण यामुळें त्यांच्या अनुभवांत भर पडेल, जिवनांत विविधता येईल व हें कार्य ते दुप्पट जोमानें करतील. असें समजतें कीं त्रिविक्रमाच्या ह्या साऱ्या सूचनांचा सरकार गंभीरपणें विचार करत आहे. थोड्याच दिवसांत त्या मूर्त स्वरूपांत येतील आणि संपूर्ण देशास देशोधडीस लावणारी ही बेकारीची समस्या अखेर संपुष्टांत येईल.

*आस्ट्रेलियाचे सुप्रसिद्ध व्यंगचित्रकार श्री. जॉर्ज मोलनार यांची गेल्या जुलै ६३ च्या अंकापासून सुरूं झालेली ही रंजक व खुसखुशीत अशी चित्रपत्रें असंख्य वाचकांना आवडली. त्याच चित्रपत्रांचा हा अंतिम भाग.*

हीच तीं व्यंगचित्रात्मक



अनुवादक : दि. श्री. कराडकर

**हाँगकाँग :**

स. न. वि. वि.

इथें वारा गोठतो. मोटारी, रीक्षा, सायकली, आणि वसेस ह्या असाहय्य वेड पांघरून सुस्त पडलेल्या असतात. ठायीं ठायीं रेल्वेची 'गेट्स' नेहमी वंद असतात. रहदारी विभागलेली असते. वाट पाहत.....वाट पाहत...वाट पाहत....

मध्येंच कुठूनतरी घर्घर् आवाज करीत विमान खालपर्यंत सुळकांडी मारतं आणि झर्रकन सगळयांच्या डोक्यावरून जाऊन पुन्हा वर जातं.

हाँगकाँग हे असं आहे. जगांतील एकमेव देश, जिथल्या रेल्वे-फाटकावर रस्त्यावरील व आकाशांतील वाहतुक एकमेकीला भेटतात.

हाँगकाँगमध्यें चिन्यांची वस्ती आहे. चिनी पौर्वात्य आहेत. म्हणून स्वरूपदर्शक आहेत.

चिनी माणूस गोणपाट शोभावी अशी पाटलोण घालतो. वर आकार नसलेला शर्ट परीधान करतो. ह्यामुळें पाश्चिमात्य शिवणकलेतील एक बाकबगार माणूस म्हणून त्याला लौकिक संपादन करता येतो. इथला प्रमुख धंदा म्हणजे २४ तासाच्या आंत 'फर्स्ट-क्लास' (हं) सूट शिवून देणें हा—शिवाय स्वस्तांत.

ठिकठिकाणचे प्रवासी इथें मुद्दाम येतात व ह्या कौशल्याचा फायदा घेतात. त्यांचं वास्तव्य मात्र २४ तासांचंच असलं पाहिजे नाहीतर ह्या धंद्याची खरी किंमत त्यांना कळणार नाहीं.




**इथे सर्वच वाहतुक सुस्त पडलेली असते**

इतरत्रप्रमाणें इथेहि मोटारगाड्या वापरल्या जातात त्या सामाजिक प्रतिष्ठा प्रस्थापित करण्यासाठीं. चिनी हुशार आहे. आपल्या वगिच्यासमोर तो आपली गाडी उभी करतो. कायमची. ह्यामुळें रस्त्यावरची रहदारीहि कमी होते, अपघातहि टळतात. शिवाय पेट्रोलचे जळण शुन्यावर राहते.

**टोकीयो :**

स. न. वि. वि.

टोकीयो फार सावं आहे. जपान्यांचा दृष्टीकोनच निराळा. पाश्चिमात्य माणूस उभ्यानें जग पाहतो तर जपानी जमिनीवर बसून पाहतो. ऐसपैसपणाचा दृष्टीकोन ह्यांत आहे पण तो चिरंतन नाहीं. (अरेरे !)

टोकीयो उष्ण आणि दमट आहे. 'सेलोफेन' मध्यें शरीर गुंडाळून गोल गोल चालल्यामुळें लांबून मी एखादं फुल वाटत होतो.

इथें 'ट्रॅफीक' 'टेरीफीक' आहे. पादचारी व मोटारहांके— प्रत्येक–जण स्वतःच्या सोईचा नियम पाळतो. दोघेहि एकमेकांचं अस्तित्व विसरलेलें असतात.

टोकीयोचा "हायवे' असून नसल्यासारखा आहे. कुठेहि जायला तो सोईचा पडत नाही. त्यावर रहदारी नसतेच. रस्ता वापरण्यासाठीं जबरदस्त कर द्यावा लागतो. म्हणूनच दुकाने रस्त्याखाली आहेत.

शहरांत चंदेरी आणि रुपेरी अशा लाखो दिव्यांचा झगझगाट आहे. निरनिराळ्या फलकांवर प्रकाशझोत टाकलेले आढळतात. भाषा समजत असूनहि प्रकाशाच्या झोतामुळें एकहि पाटी मीं वाचूं शकलों नाहीं.

माझ्या कंबरेला 'फिट्' बसेल अशी एकहि विजार 'डिपार्टमेंट स्टोर्स' मध्यें सांपडूं शकली नाही. पुन्हां लक्षांत घ्या— कंबर. ह्या असल्या कारणांमुळेंच जागतिक सदिच्छेला धोका पोहचतो.

अस्सल जपानी भोजन मोठं रमणीय असतं. रमणीय म्हणण्याचं कारण यजमानीणबाईचा मोहक चेहरा.





अनुक्रमणिका

**क्योटो :**

स. न. वि. वि.

इथें रातकिडयांची किरकिर फार त्रासदायक होते. तुम्हांला सकाळी जाग येते ती ह्या 'ऑर्केस्टा' मुळें.

क्योटो फार जुनं आहे आणि विविध स्मारकांनीं खच्चून भरलंय् ह्यामुळेंच इथें बॉम्ब टाकला गेला नसावा. पण ह्यामुळें जपानी एकदम 'फेम' झाले. ह्या परोपकाराची फेड करण्यासाठीं त्यांनीं अमेरिकेंत एक शहर शोधून काढलं कीं ज्या शहरावर जपानी बॉम्बफेक करणार नव्हते. पण अमेरिकेवर बॉम्ब टाकण्याचा प्रसंग जपान्यांवर आला नाही. युद्ध एकाएकी थांबले म्हणून.

जिकडे तिकडे अनेक तीर्थस्थानें दृष्टीस पडतात. कांहीं खाजगी आहेत. एकाचा उपयोग प्रवाशांसाठीं हॉस्टेल म्हणून करण्यांत येतो. हे प्रवासी इथें जमिनीवर झोपतात. खाणं पिणं जपान्यांसारखं तर करतातच पण राहतातहि त्यांच्यासारखेंच. देश तसा वेष!

जपानी वाचतां येत नसल्यामुळें बहुतेक ठिकाणी अडाण्यासारखा वागलो. अज्ञानांत आनंद मानावा लागला. हाहि एक सुखदायक अनुभव असतो.

एक शब्दहि बोलू शकत नव्हतों त्यामुळें सगळे व्यवहार खुणेनी केले. (कांहीं वेळा मलताच अर्थ होई) विचारांचीं देवाणघेवाण जपान्यांनां आवडतें. गप्प बसल्यामुळें माझा इथे कोणाशीच मतभेद झाला नाही; आणि एकदम पटलं कीं जगाला तारण्यासाठी सक्तीची निरक्षरता व मुकेपणा ही दोनच अमोघ शस्त्रं आहेत.

**जपान :**

स. न. वि. वि.

कमांडर पेरीने पाश्चिमात्यांसाठीं जपान शोधून काढलं. तो एका युद्धनौकेतून येथें आला पण ह्या देशाचं सौंदर्य मात्र त्यानें विघडविलं नाही.

त्यानंतर फ्रँक लॉईड राईटनें टोकीयोला आलेशान हॉटेल बांधेपर्यंत कांहींहि आक्रमक असं घडलं नाही. ह्यामुळें पूर्व व पश्चिम ह्यांचे संबंध सुधारले. फार चांगली गोष्ट आहे.

नंतर अंतर्गत सजावटीसाठीं व वास्तुकलेसाठीं अनेक कल्पक 'आर्कीटेक्स'नी जपान शोधून काढलें. बांबू आणि रंगहीन लाकडाच्या साहाय्यानें त्यांनीं अस्सल जपानी पद्धतीच्या कलाकृती करुन क्रांति केली.

हे असं कांहीं जपान्यांनीं आपल्या आयुष्यांत पाहिलं नव्हतं. पाश्चिमात्यांचें अनुकरण करण्याची लाट त्यांच्यांत पसरली. पण हेच 'अनुकरण खास जपानी' म्हणून पाश्चिमात्यांनीं उचललं. हे असं आहे. हे कधीहि संपणार नाही. ह्याला विचारांची देवाणघेवाण म्हणतात.

जपानी म्हणजे पूर्वेतील "स्वीस" आहेत. लहान-सहान गोष्टींचीं त्यांना खास आवड आहे; आणि मोठमोठ्या गोष्टींची किंमत त्यांना समजते. त्यांची फुलांची रचना 'परफेक्ट' असतें. त्याच्या शेजारी ते स्वतःची उत्तम प्रतिमा लावतात. पण पाहुण्याला मात्र ह्या दोन्हींकडें पाठ करवून बसवितात.

रस्ता ओलांडीत असतांना माझ्या डोक्यांत जपान्यांबद्दल अनेक



मी बहुतेक ठिकाणी अडाण्यासारखा वागलो

विचार घोळत होते.

लाल दिवा लागल्यामुळें मी थांबलो पण विचार चालू होते. एकाएकी मला दोन शिंका आल्या. माझ्या शेजारी गंभीर चेहऱ्याचा एक जपानी उभा होता. आपल्या नोंदवहींत तो लिहित होता— "परकीय लोकांमध्यें चमत्कारीक अंधश्रद्धा दिसते आहे. रस्ता ओलांडण्यापूर्वी ते दोनदां शिंकतात." ●●●

(समाप्त)








# मी • धुम्रपान • सोडलें



**मी** धूम्रपान करणें सोडून दिलें आहे. धूम्रपान न करण्याचा आजचा दुसरा दिवस. आतां माझ्या मनाचा अगदीं ठाम निश्चय झाला आहे. त्यामुळें मला किती आराम वाटत आहे त्याची तुम्हांला कल्पना करतां येणार नाहीं.

किती बरें वाटत आहे मला ! केवढा उत्साह वाटत आहे !

त्या खुर्चीच्या पायाचा मी दातांनीं सहज लचका तोडू शकेन. त्या टेबलाला लाथ मारली तर त्याचे सहज चार तुकडे होतील. याक्षणीं मी सर्वांचीं टाळकीं एकमेकांवर आपटीत इकडून तिकडे धावूं शकेन.

खरें म्हणजे, काल दुपारचें जेवण झाल्यापासून या सर्व गोष्टी कराव्या असें मला वाटत आहे.

अहाहा ! आज मला फार बरें वाटत आहे. कुणाचा तरी खून करावा असें वाटत आहे. तरी पण फार बरें वाटत आहे. अगदी निराळें निराळें वाटत आहे.

आज मी चिडखोर, लहरी, निराश, उद्धट, थोडा नर्व्हस् सुद्धां झालों आहे. पण तब्येत एकंदरींत फार छान आहे. आणि जरी मी आज कुणाचें टाळकें फोडलें, तरी निदान धूम्रपान सोडून देण्याचें मनोधैर्य माझ्या ठिकाणी आहे, असें माझ्या बचावांत म्हणतां येईल.

आणि शिवाय मानसिक फरक ! मन जास्त तरतरीत झालें आहे. कल्पनाशक्ति काम करूं लागली आहे. अर्थात या क्षणीं मला पाइप्स् आणि सिगारेट्स् या खेरीज दुसरा कसलाहि विचार करतां येत नाहीं ही गोष्ट खरी; पण कसला कां होईना, मन विचार करीत आहे.

मी यावेळीं अरबी समुद्रांतून प्रवास करीत आहे. आणि इथें धूम्रपानाइतकी मनाला मोह घालणारी दुसरी गोष्ट नाहीं हें खरें. माझा घसाहि आतां सुकल्यासारखा झाला आहे, ही गोष्ट देखील खरी; पण या गोष्टींचा आणि त्याचा कांहीं संबंध नाहीं. धूम्रपान करावयाचें सोडून देण्याचा विचार माझ्या मनांत नेहमीच वास करीत आला आहे. आणि आतां तर मी तें खरोखरच सोडून दिलें आहे. किती घाणेरडी सवय होती ती. धूम्रपान केल्यानंतर पाईपाचा आंतील भाग कसा होतो तुम्ही कधीं पाहिलें आहे ? विश्वास बसणार नाहीं तुमचा. असा हा पाईप ओढण्यापेक्षां डबक्यांत काडी बुडवून ती चोखावी. एका अर्थी हें जास्त चांगलें. कारण डबक्यांत शरीराची खराबी करणारें विष निकोटिन् नसतें.

आज मला फार बरें वाटत आहे. आणि मला राग सुद्धां असा आलेला आहे. आणि भूक तर अशी लागली आहे कीं ती साबूची वडी मी सहज चावून खाऊं शकेन.

धूम्रपान सोडल्यानें माझा किती वेळ, त्रास आणि खर्च वांचणार आहे, त्याच्या विचारानेंच मला किती आनंद झाला आहे. वांचणार आहे कशाला, वांचण्यास सुरवात देखील झाली आहे. किती वस्तु जवळ बाळगाव्या लागत ! कपडे करतांना, बाहेर जातांना, कपडे बदलतांना– प्रत्येक वेळीं तोच त्रास; सर्व गोष्टी घेतल्या आपण ?

एक पाईप (सर्वसाधारणपणें दोन), तंबाखूची डबी (भरलेली आहे ना ? नसल्यास, डबा कुठे गेला बुवा ?), आगपेटी, पाईप साफ करण्याचें साहित्य, टोंचणी, आणि तंबाखूचे कांहीं गुलाम तर जवळ सिगारेट्स् सुद्धां बाळगतात. किती हा केरकचरा ! खिसे फुगलेले आहेत, व्यवस्थितपणा नाहींसा झाला आहे.

आज मात्र मी इथें कसा व्यवस्थित बसलों आहे. खिसे फुगलेले नाहींत, कसलीहि काळजी नाहीं, छे, बिलकुल काळजी नाहीं.

आणि मुख्य म्हणजे त्या आगपेटीच्या त्रासांतून मुक्तता. पाईप ओढणाऱ्या सर्वच लोकांच्या ही गोष्ट लक्षांत आलेली नसेल; पण अशा लोकांच्या आयुष्यांतील सुख दुःख आगपेटींत काड्या किती असतील, यावर बरेंच अवलंबून असतें.

पेटी भरलेली असेल तर आनंदाची परिसीमा; ती कुणी पळवून नेली तर दुःख; काड्या संपुष्टांत येऊं लागल्या म्हणजे वाढती काळजी; शेवटची काडी विझून गेली–

नैराश्य; कुणाकडे पेटी मिळत नाहीं – डोकें फिरणें, खून, वाटेल तें.

आणि विशेष म्हणजे पाईप ओढण्याचा 'त्रास'. पूर्वी जेव्हां मी धूम्रपान करीत असे (म्हणजे परवां), तेव्हां मी 'बी' डेकवरील याच कोंपऱ्यांत बसून लिहीत असे—आणि पाईप ओढीत असे.

आतां इथें अरबी समुद्रांत माणूस नेहमीं वारा येईल अशाच जागीं बसतो; आणि मन कुठेंतरी गुंतलेलें असलें म्हणजे साधारणपणें दर दोन मिनिटांनी पाईप विझतो असें माझ्या नजरेस येतें— किंवा येत असे. मग माझे विचार करणें थांबत असे आणि मी काडी पेटवीत असे; वाऱ्यानें ती लगेच विझत असे. मग मी आणखी दोन काड्या पेटवीत असे. मग मी उठून स्मोकिंग रूममध्यें जात असे. आणि पाईप पेटवून परत येत असे. मग पुन्हां माझें काम सुरूं होई.

मला · वाटतें, एखाद्या दिवशीं राचा वारा असला आणि मन कामांत एकाग्र झालें असलें म्हणजे मला पाईप पेटविण्यासाठीं किती वेळां उठावें लागत असेल त्याची तुम्हांला कल्पना करतां येईल. आतां तुम्ही विचाराल, मन जर इतकें एकाग्र होतें, तर मग पाईप ओढण्याची गरजच काय ? असा प्रश्न विचारण्यांत कांहीं अर्थ नाहीं. त्याला उत्तर नाही. मी ओढतों एवढेंच. किंवा ओढीत 'असे'.

पण तें सारें आतां संपलें आहे. आज मी पाईप ओढीत नाहीं. इथें बसून मी सारखा काम करीत असतों. माझ्या कामांत मुळींच व्यत्यय येत नाहीं. कधीं मधेंच अेखादा उडता मासा वगैरे पाहण्यास उठलों किंवा कांहीं बिनतारी संदेश आहे कीं काय तें पाहण्यास स्मोकिंग रूप मध्यें गेलो, किंवा कांहीं पेय वगैरे घेण्यास एखादे वेळीं उठलो तर गोष्ट वेगळी. पण पाईपचा त्रास नाहीं. वाऱ्याचा त्रास नाहीं, काड्यांचा त्रास नाहीं.

उदाहरणार्थ विझलेल्या काड्यांचा त्रास· तो एक मोठाच प्रश्न असे. डेकवर बसलों असतांना विझलेल्या काड्यांचें काय करायचें ? मी स्वभावतःच फार व्यवस्थित आहे आणि आमच्या मुख्य अधिकाऱ्यालाहि तें आवडत नाहीं, म्हणून मी त्या डेकवर टाकत नाहीं. कधीं कधीं मी त्या पुन्हां पेटींत ठेवून देत असे· पण मग कुणी आंग्ल स्त्रिया येऊन काड्या मागीत, मी पेटी पुढें केली म्हणजे त्यांतील कांहीं जळलेल्या काड्या त्यांच्या हातांत येत असत आणि मग त्या माझ्या नांवानें बोटें मोडीत असत. ती पेटी माझी आहे आणि ज्यांच्याजवळ स्वतःची पेटी नाहीं त्यांना तक्रार करण्याचा कांहीं हक्क नाहीं, असें त्यांना सांगण्याची सोय नसे. मग मी एक तिसराच मार्ग शोधून काढला. सहा सात काड्या होईपर्यंत, मी त्या एके ठिकाणीं गोळा करून ठेवीत असे आणि मग कठड्याजवळ जावून त्या पाण्यांत भिरकावून देत असे. पण यांत कांहीं वेळ खर्च होत असे. आणि शिवाय स्मोकिंग रूमपर्यंत जाणें, काड्या पेटविणें, काड्या उसन्या देणें, पाईप भरणें, तो साफ करणें, टोंचणीनें खरवडणें, ठोकून साफ करणें, तंबाखू संपला म्हणजे तो आणण्यासाठीं केबिनमध्यें जाणें, या साऱ्या गोष्टींमध्यें अंगाचा थरकांप होतो.

'असे'– लक्षांत ठेवा. कारण तें सर्व आतां भूतकाळांत विलीन झालें आहे. पुन्हा कधींहि नाहीं. तरी सुद्धां सहज गंमत म्हणून या साऱ्या खटाटोपासाठीं एकूण किती वेळ खर्च होत असे, पहावयाला हरकत नाहीं. पाहूं या. (मी खालीं केबिनमध्यें जाऊन त्या साऱ्या वस्तु घेऊन येतों हं ! )

पाईप व्यवस्थितपणें भरण्यास कमींत कमी पंचेचाळीस सेकंद लागतात. अर्थात तंबाखूची पिशवी जवळ होती म्हणून, ती नसती तर ती टेबलाखालीं, खुर्चीखालीं वगैरे शोधण्यास पंधरा सेकंद सहज लागले असते. म्हणजे कमींत कमी एक मिनिट झालें. कधीं कधीं दोन अगर तीन मिनिटें देखील लागतात. नंतर आगपेटी शोधणें, आणि चारपांच काड्या पेटविणें– एक मिनिट. पाहिलेंत ? दोन मिनिटें गेलीं सुद्धां. आतां पाईप पेटविण्यासाठीं स्मोकिंग रूम मध्यें गेले पाहिजे. चला. इथें येऊन पाईप पेटवून परत डेकवर जाण्यास किती वेळ लागला ? पाहूं या हं.

आ – आ – आ – हं !

एक मिनिट म्हणूं या.

आणि हा सारा पाईप ओढून होई पर्यंत किती वेळ खर्च होत असे ?

पाहूं या हं— • • • •

—विठ्ठल रामजी भाटकर



## कोडें

ना मिळे अन्न
ना मिळे पाणी
नसे अंगभर कपडा
तरी जगण्याची सक्ति कां,
कोडें हें उलगडेना ।।१।

न मिळे शांती
न मिळे सुख
नसे समाधानाचा वास
तरी जगण्याची सक्ति कां,
कोडें हें उलगडेना ।।२।।

न मिळे प्रेम
न मिळे माया
नसे माणुसकीचा वास
तरी जगण्याची सक्ति कां,
कोडें हें उलगडेना ।।३।।

न उघडे दैव
न मिळे लाभ
वसे चिंता सदैव मनीं
तरी जगण्याची सक्ति कां,
कोडें हें उलगडेना ।।४।।

माणूस म्हणून जगण्याचे
होते एक स्वप्न
भंगले या जगीं
तरी जगण्याची सक्ति कां,
कोडें हें उलगडेना ।। ५ ।।

—सौ. इंदुमति देव






## अंगे भिजली जलधारांनी

पान २६ वरून

होऊन पालकर राजाच्या आज्ञेप्रमाणे चारुदत्ताला फाशीची शिक्षा होते. इकडे वसंतसेना विरह गीत गात रानावनांतून भटकत असते. शकार तिला भेटतो व चारुदत्ताला फाशी दिल्याचे सांगतो. वसंतसेनेला वाईट वाटते. कुणाशीं तरी लग्न करायला हवंच–ते शकारशी केलेलं काय वाईट ? या विचाराने ती शकारशी लग्न करते. वसंतसेना जिवंत असल्याचे कळताच चारुदत्ताची मुक्तता करण्यांत येते. पण ती शकारशी विवाहीत झालेली पाहून त्याला फार वाईट वाटते. व त्याच सुळावर तो आत्महत्या करतो." "चित्रपटाचा शेवट छान आहे." आनंदाने निर्माते गोडबोले जवळ जवळ ओरडलेच.

"बाया बापड्या घरा पावत्तोर रडत जात्याल !" बाबुराव गवळींनीं आपली पसंती दर्शविली.

चहा चिवड्याच्या समाचाराबरोबर चित्रपटाबद्दल बऱ्याच कल्पना सुचविल्या गेल्या, खोडल्या गेल्या व मुहूर्ताची तारीख ठरवून बैठक संपली.

एका मंत्र्याच्या हस्ते चित्रपटाचा मुहूर्त होऊन "अंगे भिजलीं जलधारांनीं" या चित्रपटाच्या शुटींगला सुरवात झाली.

चित्रपटाची नायिका कुंदाबाला नवोदित नटी असल्याने दिग्दर्शक फारच मेहनत घेत होते. कुंदाबाला तशी फारच भिडस्त ! कुठल्याहि गोष्टीला तिची सदैव तयारी ! यामुळें चित्रपटाचे शुटींग विद्युत वेगाने होत होते. दिग्दर्शक नरेश, निर्माते गवळी–गोडबोले तर वसंतसेनेवर चारुदत्तापेक्षां जास्त फिदा होते. पावसाच्या सीनचे आऊट डोअर शुटींग महिनाभर चालले. अपुऱ्या वस्त्रांतील अर्धनग्न वसंतसेना रोज ओलिचिंब होऊन चारुदत्ताला बिलगे. पण दिग्दर्शकाच्या मनासारखा शॉट जमत नव्हता. दिग्दर्शक नरेश पुनः पुन्हा वसंतसेनेला जवळ घेत व कसे बिलगायचे ते शिकवित. एक दिवस चारुदत्ताचे काम करणाऱ्या नटाला कोणी तरी सांगितले की 'तो सीन केव्हांच चित्रीत झाला आहे. आतां नुसती कॅमेरापुढे तालीम चालते.' 'चारुदत्त' न सांगताच मुंबईला पळाला. तरी पंधरा दिवस पावसाच्या सीनचे चित्रण चालले.

चित्रपट पूर्ण झाला. सेन्सार पुढे गेला. आणि त्याचे दुर्दैव असे की निम्म्याहून अधिक चित्रपटाला कात्री लागली. चित्रपटाचे प्रमुख आकर्षण जो पावसाचा सीन तोहि त्यांतून सुटला नाही. निर्माते दिग्दर्शकांची पांचावर धारण बसली. शेवटी बोर्डाच्या संमतीने कांहीं सौम्य प्रसंग घालण्याची परवानगी मिळविली व एकदाचा चित्रपट पूर्ण झाला. पण वितरकांनी चित्रपट घेण्याचे नाकारले..कोणी चित्रपट घेण्यास तयार होईना. तेव्हां निर्मात्यांनीच खटपट करून दोन तीन चित्रपटगृहे मिळविली. व 'अंगे भिजलीं जलधारांनीं' हा चित्रपट मुंबईत लागला.

चित्रपटाच्या पहिल्याच दिवशी मुंबईत धोधो पाऊस पडू लागला. संध्याकाळीहि तो थांबला नाही. निर्माते–दिग्दर्शक व इतर तंत्रज्ञ मंडळी थिएटरांत आली. पहातात तो सर्व थिएटर मोकळे. एक पेन्शनर, दोन विधवा वृद्ध स्त्रिया, एक सबगोलंकार मद्रासी अय्या व एक सर्वोदयवादी पुढारी एवढेच प्रेक्षक ! निर्माते दिग्दर्शकांच्या तोंडचे पाणी पळाले. मध्यंतरापूर्वीच ते पावसांतून पळत सुटले. वरून मुसळधार पाऊस कोसळत होता व तोंडांत 'अंगे भिजलीं जलधारांनीं' हें पद घोळत होते.

एकदोन दिवसातच चित्रपटाचा कारभार आटोपला. भराभर चित्रपटाच्या पेट्या परत येऊ लागल्या. चित्रपट चांगलाच आपटला. कथाकार किशाभाऊ चोरगे तर या धसक्याने आजारीच पडले. त्यांचे पहिले अपत्य जन्मले आणि लगेच गेले, पण मरताना त्यांच्या कीर्तिला कलंक लावून गेले. चित्रपट निधनाच्या दुःखात असतानाच सांगलीहून त्यांना एक पत्र आले. पत्र पुढील प्रमाणे होते.

सांगली.

×××

प्रिय महाशय (?)

कै. गोविंद बल्लाळ देवल यांच्या मृच्छकटिक नाटकांतील कांहीं भाग आमची परवानगी न घेता चित्रपटांत घुसडला व त्याला बाजारी, हीन स्वरूप देऊन नाटकांची बदनामी केली या बद्दल तुमच्यावर कायदेशीर इलाज कां करू नये याचे पंधरा दिवसांत उत्तर द्यावे.

आपला

×××

चित्रपटांतील चारुकुमाराप्रमाणे–नव्हे नाटकांतील चारुदत्ताप्रमाणे किशाभाऊ चोरग्यांची स्थिति झाली आहे व मरण बरे वाटते असे म्हणून चित्रपटांतील चारुकुमाराप्रमाणे आत्महत्या करावी असे त्यांना प्रकर्षानें वाटू लागले आहे. ●●●

### एकाच वेळीं तिन्ही स्टंप्स् !



फलंदाज जेव्हां बाद होतो तेव्हां दांडी उडाली असेल तर फार फार तर एखादा किंवा दोन "स्टंप्स्" पडतात. हा नेहमीचा अनुभव परंतु एकाच वेळीं जेव्हां तिन्ही "स्टंप्स्" पडतात तेव्हां तो कौतुकाचा विषय होतो. अशा तऱ्हेची अघटित घटना दोनदां घडली आहे.

१८४९ सालीं एडिंबर्ग येथें झालेल्या स्कॉटीश ( बावीस खेळाडू ) विरुद्ध इंग्लंड ( अकरा खेळाडू ) ह्या सामान्यांत चार्लस् लॉरेन्स् ह्या गोलंदाजानें फेलिक्स् ह्या फलंदाजाला बाद केलें तेव्हां तिन्हीच्या तिन्ही "स्टंप्स्" जमिनीवर कोसळल्या होत्या !

असाच पराक्रम यॉर्कशायरच्या जी. फ्रीमन ह्या गोलंदाजानें केला होता. ३० मे १८७० रोजीं लॉर्डस् येथें एम्. सी. सी. विरुद्ध सामना खेळतांना त्यानें सी. आर. फिलगेट ह्याला गोलंदाजी टाकतांनां तिन्हीच्या तिन्ही "स्टंप्स्" खाली पाडले होतें !

*" काय मिस्टर रिद्म आणि मेलडी —*
*"अरे, डौंबलाची मेलडी. ती बघा आंत*
*केबिनमध्यें बसली आहे विझडम्*
*आणि आमची ट्रॅजेडी" गजाभाऊ. खरंच*
*गजाभाऊची ट्रॅजेडी झाली होती आमच्या ऑफिसांत.*
*त्यांचं ऑफिसांतलं श्रेय हरपलं होतं.*
*चांडपडत, तळमळत गजाभाऊ तें शोधित होते........*

—रसिक मनोहर






**"रसिक मित्रहो,** आजपर्यंत मला लहानमोठीं अनेक बक्षिसं मिळाली. पण आपण दिलेल्या ह्या पेल्याची अपूर्वाई कांहीं और आहे. कारण माझ्या सहकाऱ्यांनीं आज माझं ऑफिसांत चीज केलं. हजार रुपये बिदागी मिळाली असती तरी मला एवढा आनंद झाला नसता".. लंच टाईम मध्यें भरलेल्या त्या छोटयाशा सभेंत एक व्यक्ति सद्गदित स्वरांत बोलत होती. भावना उचंबळून आल्यामुळें शब्द उमटत नव्हते— खूप खूप बोलावसं वाटूनहि ! "आपल्या सेवेसाठीं मी केव्हांहि तयार राहीन. गाऊं गुनन कैसे तुमरो, गून नाहि मोमे अब...' मारुबिहागांतल्या एका चिजेचा चरण कसा-बसा म्हणून ती व्यक्ति भारावलेल्या अंतःकरणानं खालीं बसली.

गजाभाऊ मांटे हे आमच्या ऑफिसांतील संगीत कला निधी ! अगदी ऑफिस गंधर्व. नाहीतरी गंधर्वाची ही परंपरा तानेच्या सट्टयासारखी बाल, कुमार, छोटा, किंचित् अशा वयाच्या दाखल्यावरून, गुणी सवाई अशा गुणांवर आवर्तन घेऊन महाराष्ट्र, हिंद अशा भौगोलिक प्रांतांत येऊन पोंचलीच आहे ! मग आतां ऑफिस गंधर्व, कॉलेज गंधर्व, गल्ली-गंधर्व असे निर्माण होण्यानें-किंवा करण्यानें सामवेदापासून निर्माण झालेल्या संगीताचं दाम, दंड, भेद हीच वेदवाक्यं असलेल्या हल्लींच्या युगांत फारसं बरंवाईट होण्याची शक्यता कमीच !

दैव तरी कसं अनवट राग गातं बघा ! चार चार तास मेहनत पिसून नरडं घासायची गजाभाऊंची आकांक्षा तर नशिबी आली खर्डेघाशीं ! ज्या हातांत हत्यार घ्यायचं त्याच हातांत लेखणी. रागाचे आरोह अवरोह लक्षांत घ्यायाचे ते प्रॉव्हिडंट फंडाच्या नियमांचे आरोह अवरोह घोटवावे लागत. विशेषतः फंडांतून कर्जासाठीं अर्ज आला कीं एखाद्या रागांत कुठला स्वर कोमल, तीव्र वा वर्ज्य ह्यापेक्षांहि फंडाच्या नियमावलीची बंदीश वगैरे कायद्यांतून पळवाटा काढण्याच्या मार्गांत असतां, हो स्वारी फावल्या वेळांत टेबला-वरच बोटांचा चाळा करीत एखाद्या कायद्यांचा कीस काढण्याचा प्रयत्न करी. गजाभाऊ लयीच्या नि तालाच्या संबंधांत चुस्त असायचे, मग वरिष्ठांना कामाचा नि पगाराचा संबंध तंबोऱ्याची खुंटी पिळल्या प्रमाणें समज देऊन समजवावा लागे. वरिष्ठां-

सांभाळावी लागे. गजाभाऊंच्या गळयांत चैन होती, पण ती ऑफिसांत कशी चालावी ? त्यांना नजर होती फक्त गाण्यांत, म्हणून तर वरिष्ठांची नजर त्यांच्याकडे वळणं महा मुष्किल. ऑफिसच्या कामांत तबियत लागलीच नाहीं त्यांची कधीं. कुणी आपुलकीनें चार शब्द सांगावेत तर "जियेरा मानत नाहि.." ही ह्यांची हुंकारांतून निर्माण झालेली बोलतान ! अशा परिस्थितींत त्यांचं कामाकडे लक्ष लागत नसे, सारखं ठेका चुकल्यासारखं वाटे. आणि मग साहेबांची बोलणी खावीं लागत. साहेब-सुद्धां एकदम दुगणित गिरे ! ह्या बाबतीत साहेबाचा जबडा तर नुसता तय्यार. प्रारंभीचा गंधार षड्ज लावतांना साहेब आजकालच्या गवयासारखें अशा कांहीं मुद्रा करीत कीं जणू बद्धकोष्टतेच्या विकारावर ते मात करीत आहेत ! हेडक्लार्क. सेल्सटॅक्स, इन्कमटॅक्स









अनुक्रमणिका

बरोबरीची ह्यांची जुगलबंदी कधीं रंगलीच नाही. आणि मग गजाभाऊ एकदम वैतागून म्हणायचे– "जीव द्यावासा वाटतो, तंबोऱ्याच्या भोपळ्यावर डोकें फोडून !"

पण वैराग्य क्षणिक असे. एरव्ही त्यांचा स्वभाव भारी रसिला व विनोदी. हंसेल तो विकसेल 'ह्या उक्तिचं मूर्तिमंत प्रतीक ! उपेक्षा, उपहास, उपमर्द ह्या शिवाय कांहीहि पदरीं पडलं नाही अशा ऑफिसाबद्दल त्यांच्या मनांत तिळमात्र अढी नव्हती. ते ऑफिसांत येत ते अकृत्रिम निर्व्याजपणें, फलाची अपेक्षा न करतां सहजपणें ! इतर सहकाऱ्यांप्रमाणें आपापसांतील लफडीं घोळवीत नसत्या अफवा पिकवीत, वरिष्ठांबद्दलच्या कंड्या रंगवीत न येतां, गजाभाऊ "काहे सताओ मोहे शाम" सारख्या ठुमरीचा चरण स्वतःशीच ढंगदारपणें आळवीत, "प्यारी पाग बोल–" मधल्या "प्यारी" ह्या शब्दाचा खोंचदारपणें उच्चार करीत, रागिणीची रंगत वाढवीत स्टेशन ते ऑफिसपर्यंतचा मार्ग कापीत. मस्टरमध्यें सही करतांना सफाई व मुलायमपणा असा कीं, तंबोऱ्याची तारच

**संन्यास**



दिल्लीचा आजोबा । विटे संसारास
'घेतों मी संन्यास' । म्हणे आता
'पोरांनों तुम्हींच । चालवा हो राज्यें
किल्ल्या ठेवा माझें । कनवटीं'

–'आंदटीं'

छेडीत आहेत. सही होतांच मस्टरमधल्या पेन्सिलचं दुसरं टोंक डेस्कवर आपटायचं ते अशा थाटांत कीं, सहज चाट मारून तबला जुळला आहे कीं नाही ह्याची खात्री करून घेत आहेत ! गजाभाऊ ऑफिसांत प्रवेश करीत ते आपल्याच नादांत, कसल्यातरी धुंदींत !

कुठल्याहि एका सेक्शनमध्यें निरुपयोगी ठरल्यामुळें त्यांची दोन खात्यांत विभागणी करण्यांत आली होती अलिकडे ! ज्या बोटांनीं तंबोऱ्यावर षड्ज पंचम छेडायचे त्याच बोटांनीं सकाळीं प्रॉव्हिडंट फंडाच्या लेजरबुकाचीं पानं चाळायचीं व संध्याकाळी एखाद्या ठेक्याची लय लक्षांत घेऊन, टेबलावर वा मांडीवर हातानें ताल धरून मात्रांचा हिशेब पक्का करीन म्हणावं तर इन्वर्ड आऊटवर्ड बुकांची उघडझांप करावी लागे ! प्राव्हिडंट फंड सेक्शनचा हेड दिवेकर म्हणजे अकालीं गंभीर व वृद्ध झालेला इसम. काळ, काम वेगाचा ताल आणि रुपये नया पैशाचा सूर ह्या व्यक्तिरिक्त संगीतच नव्हतं त्यांच्या जीवनांत "ऐन उमदींत नाही जमवली वडी कवडी, तर म्हातारपणीं उडेल" रेवडी !" हे ह्याचं जीवनविषयक तत्त्वज्ञान." च्यायला, काय अर्थ आहे असल्या जिण्यांत–अभोगी नुसता !" गजाभाऊंचं मत. इन्वर्ड आऊटवर्डचा मुकादम (गजाभाऊंचा खास ठेवणींतला शब्द !) धाकप्पा हा तर कानडी अप्पा. "वगिच यकसारखं टाइम कशाला वेष्ट करितो ? त्ये कंप्नी पगार फुकटचा गालते काय ? इडियट, तांडकाढून मला मुकादम म्हंटो–" हा ह्याचा








अनुक्रमणिका

कौनडा. मिळून गजाभाऊंचं ऑफिसांतलं काम असं जोडरागासारखं संमिश्र होतं येट अभोगी कानडा !" अभोगीतून कान-डयांत चाललों वरं का ?" अशी जागा दाखवून तें दुपारी खातं बदलीत. तसं पाहिलं तर गजाभाऊंनी सारं ऑफिसच रागमालेंत बसवलं आहे. सदा किरीकिरी करणारा, ओव्हरटाईम पास न करणारा चिफ् अकाऊंटंट हा ह्यांच्या दृष्टीनें महा-'खट्' तर नेहमी उपाहासात्मक वक्री बोलणारा व नाटकी वागणारा अकाऊंटंट हा 'नट' ! आपल्या अंगच्या गुणावर व कर्तृत्वावर प्रतिष्ठा मिळविणारे इंजिनीयर दाणी ही 'गुणकली' तर अंगांत कसलाच राम नसतांना राम भरोसे मानाच्या जागीं मिरवणारा ए. एस्. एस्. मनी ( खरं नांव ए. एस्. सुब्रमणियम् "कुणी आनंदी म्हणतं कुणी नंद तसला प्रकार"–इति गजाभाऊ ! ) ही ह्यांची 'रामकली' भयताचे पास फाडणाऱ्या कारकुनाच्या निर्विकारपणानं गिन्हाईकांची बिलं फाडणारा देवगिरीकर हा 'देवगिरी बिलावल.' सकाळचा चहा घेऊन कॅन्टिनवा मट आला कीं, "हा मटियार वरं का ?" ही ह्यांची मखलाशी व दमेकऱ्यासारखा वाराहि महिने खोक खोक खोकणाऱ्या रामजी शिपायाला 'खोकर' ही पदवी ! "अशा ह्या 'सवरस' ऑफिसांत स्वतःचं 'कल्याण' करून घेईल तोच 'शहाणा' वाकीचे 'अडाणा' . . . "ही गजाभाऊंची पेटंट चीज ! "काय मिस्टर रिद्म अॅन्ड मेलडी–"वावू दणाईत–ऑफिसांतील विनाका गीतमाला. "अरे, डोंवलाची मेलडी. ती वघा आंत केबिनमध्यें वसली आहे विझडम् आणि (आमची) ट्रॅजेडी !"

खरंच गजाभाऊंची ट्रॅजेडी झाली होती आमच्या ऑफिसांत ! एखाद्या अनवट रागाचं रहस्य त्यांना सहज उमगत असे, पण ऑफिसमध्यें प्रमोशनं कशी मिळतात हे कळलं तरी वळत नसे. तसा ते आपला टप्पा ओळखून होते. "आपली राव काळी दोन पट्टी, पांढरी पांच आपल्याला झेंपायची नाही !"ही वृत्ती आपल्यापेक्षां वयानं लहान पण लायकीनं थोर अशा माणसांना वढती मिळाल्यास त्यांना मुळींच वाईट वाटत नसे. मैफलींत सुरासुराला दाद देतांना शद्बांची कंजुषी करायची नाही ही वृत्ती ते अशा वेळींहि निरागसपणें वारण करीत ! परन्तु आपण किंवा इतरांपेक्षां लायकीनें कमी असलेला माणूस केवळ वशिलेवाजीनं प्रमोशनं घेऊं लागला कीं त्यांना सात्त्विक संताप येई. संगीतांत बुवावाजीमुळें व ऑफिसांत वशिलेवाजीमुळें आपण मागें पडलों" असा त्यांचा ख्याल होता. आयु-ष्यांत त्यांनीं कसलीच वाजी केली नाही आणि म्हणूनच त्यांना कसलीहि वाजी मारतां आली नाही ! लायकी, अनुभव, वशिला, लाचारी, मस्कावाजी, जात, गांव ह्या सप्तसुरांपैकी कुठला स्वर लावला असता प्रमोशन मिळेल हे कोडं त्यांना कवींच सुटलं नाही. हमखास मिळणाऱ्या प्रमोशनच नोटेशन कोणी करून दिलं तर ते त्यांना हवं होतं. पण कांहीं खाँसाहेब चिजा चोरून ठेवतात हा संगीतातला अनुभव त्यांना ह्याहि वावतींत आला. इथं सोयीप्रमाणें लायकी, अनुभव अशा स्वरांची नांव सांगण्यांत आली तरी प्रमुख स्वर लागायचा तो जातीचाच ! "यमन म्हणा, कल्याण म्हणा पण स्वर लावायचा तो तीव्र मध्यमच. आमचं ऑफिसांतलं घराणंच चुकलं बुवा–" असा त्यांनीं निष्कर्ष काढला. संगीतांत ग्वाल्हेर घराणं उपयोगी पडलं तरी ऑफिसांत कारवारी घराणंच अधिक सोयीचं अशी त्यांची खात्री होती. "नाले, कारवा-र्यांनाच वरती आणणार–" हा गजाभाऊंचा तंबोऱ्याची शपथ घेऊन निघाला तराणा ! रागांतल्या विशिष्ट जागा घ्यायचा नादांत, ऑफिसांतली वरची जागा आपल्या हातून निसटल्याची त्यांच्या लक्षांत येत नसे, कारण हे आपले "देखो मोरी चुरियाँ करके गैंया. . . मध्यें घुसलेले अमायचे ! आणि लक्षांत आल्यावरहि ह्यांच्या हरकतीला कुणीहि दाद देत नसे. नाडकर्णी, कुळकर्णी, वागळे, देसाई, प्रभू, शानभाग वगैरे मंडळींना वेळोवेळीं मिळालेली प्रमोशनं पाहून आपलं ऑफिसांतलं घराणं उत्तर वा दक्षिण कानडांतलं नाही ह्याचा त्यांना मोठा खेद होई आणि मग हेडक्लार्क एम्. गोपाल रावांकडे जाऊन आर्त स्वरांत विलाप करावासा वाटे–"गोपाला मेरी करुणारे नाहि आता . . ."

**'गरम....सोडा'**



'साहेब — सोडा म्हटलं तर दचकून ओरडता काय ? नको असेल तर सोडा. . !!!'

त्यांची नि माझी बरीच सलगी होती. 'नला गाण्याचा कान आहे ही त्यांची भावना, कारण आमच्या सौ. ची संगीत साधना ! आमची सौ. प्रो. संगीतभास्कर दगडुबुवा ठणठणपूरकर ह्यांच्या "पंचम' अभिजात व सुगम संगीताचे शिक्षण केंद्र. गांधर्व महाविद्यालय मंडळाच्या सर्व परिक्षांचा व एस्. एन्. डी. टी. च्या बी. ए., एम्. ए. पर्यंतचा अभ्यास करून घेण्याची व संगीताच्या सरकारमान्य परिक्षांना बसविण्याची खास व्यवस्था "ह्या क्लासमध्यें क्लासिकल म्युझिक शिकत होती. पण आपण हिराबाई व्हायचं, ज्योत्स्नाबाई कीं माणिक वर्मा हेंच अजून ठरत नसल्या मुळें तिच्या संगीताची गाडी "घुंडू बारे सैंया–" स्टेशनवर शिट्या फुंकीत सिग्नलची वाट पहात उभी आहे !" हे काय ग आई, तू आपलं सारखं सारखं घोंडू गड्याचं गाणंच कां म्हणत बसतेस ?" असा माझ्या मुलीनें (वय वर्षे ४) तिला 'किलबिल' मध्यें छापण्याजोगा प्रश्न अनेकदां विचारला होता. बायकोच्या संगीताची हौस पुरविणारा हौशी नवरा म्हणून माझं बरकरणी बरंच कौतुक (व आंतून कींव) केलं जात होतं. घरांत आमचं द्वंद्वगीत सुरू होऊं नये म्हणून मी तिच्या संगीताचा षोक पुरवित होतो ही गोष्ट अलाहिदा ! आमच्या बैठकींत गजाभाऊ सौ. साठीं रियाजाच्या टीप्स आपुलकीनें देत–" आवाज कसा पाहिजे मिस्टर, बुलंद–रंगेल नजाकतीचा' "आवाजाचा लगाव, बिजेचा मुखडा, बढत व अंतरा, तानउपज, बोलतांना गमकेची तान ह्यावर ते अंगांत तानाजी संचारल्या सारखे बोलत. "पहिला ख्याल संपवून दुसरी गात होतो. 'कुबजेनें जादू डाला' ह्या ठुमरीच्या 'रात अंधेरी बिजली चमके' ह्या अंतऱ्याला सुरुवात केली. मात्र राव आणि आमचं कर्म उभं राहिलं. दिवाणखान्यांतले पेट्रोमॅक्सचे दिवेच फककन् गेले कीं ! त्या तानसेननं दिवे लावले नि ह्या तानसेननं घालवले–" असे संगीताचे विनोदी किस्से दिलखुलास हंसत हंसत सुनवीत कधींमधीं. ते कुठल्यातरी म्युझिक सर्कलचें आधारस्तंभ होते. आपल्या मेंबरांचे कान कसे तयार आहेत ह्याचा त्यांना सार्थ अभिमान होता. "एकदां बरं का, आम्ही त्या ह्याचं गाणं ठरवलं. त्याला आधींच इशारा दिला इतर गवयांनीं– बाबारे, कल्याणला गाणार तर जरा जपून. नाहीतर तुझं नेंहमीचं दळण दळशील. उगाच अंधार पडेपर्यंत गंधार लावीत बसूं नकोस–" असेच एक दिवस ते माझ्याकडे आले दुपारच्या सुटींत.

" या तानसेन, कशी काय तब्रियत ?' मी त्यांचं स्वागत केलं.

" उगाच काय थट्टा करतां ? थोडासा पोक आहे झालं !"

" कसंहि असलं तरी तुम्ही आमच्या ऑफिसचे तानसेनच–"

" कसले तानसेन नि बिनसेन ? त्या

> **'पोट' आणि 'काम'**
>
> **बीभत्स रसाला ।**
> **मासिकी पिळोन**
> **'षोकी'न हो जन ।**
> **खूप केले**
> **'पोट' तिडीकीनें । काम ऐसे चाले**
> **समाजाचे भले । घडों देवा**
>
> **–'आंदर्टी'**

उग्रसेनांनीं ठरवलंय् आम्हांला इन्सेन !"

" वाहवा, वहोत खूप ! "

" खरी मिजास तुमची राव ! कंपनीचे ऑडिटर तुम्ही. म्हणजे चीज कशी अगदीं दरबारी–" असं म्हणून त्यांनी आमच्या नेंहमीच्या शेऱ्यांतला "चेक्ड ॲन्ड फाऊन्ड करेक्ट "हा तुकडा दरबारींत म्हणून दाखवला.

गजाभाऊंची खरी मैफल रंगायची ती लंचटाईममध्यें ! " मोरा बन्सीवाले कान्हा" ही ठुमरी सुंदराबाई, बडे गुलाम अली आणि सिद्धेश्वरीदेवी कशी म्हणतील ह्याचं प्रात्यक्षिक होई कधीं कधीं. तबलजीनें तबल्यासाठीं पावडर मागितली असतां घरांतल्या नोकरानें• आरसा, पावडरचा डबा, कंगवा, व तेलाची बाटली आणून आपल्या एका गाण्याच्या मैफलीला कशी शोभा आणली, 'सुन्दरी मोरी काहे को' ही चीज रंगवून मध्यंतर घेतलेल्या गवयाला एका अडाण्यानें "वा बुवा मस्त मजा आली. विशेषत: तुमचं मोरीवरचं काम फारच चांगलं झालं" अशी प्रशस्थि देऊन अभावितपणें हंशा कसा पिकवला वगैरे आपल्या पोतडीतल्या अनेक गंमती सांगत. त्यांना व्यसन एकच तेहि बनारसी पानाचं ! हे पान घोळवून घोलवून खाण्यांत स्वारी रंगून जाई. " हे पान रंगतंहि छान, बनारसी ठुमरीसारखं !" गजाभाऊंचा नेंहमीचा लेहरा तोंडांत पान रंगवीत, "ना मारो पिचकारी " चा चरण घोळवीत ठुमरीसारख्या रसमय पिचकाऱ्या मारण्यासाठीं गप्पांच्या मैफलींतून ते अधूनमधून उठत–

" अहो, कसली ठुमरी आळवतां, कपाळाची–" मागील दारानं 'ए' ग्रेड मिळविलेला कंटक सुचवी.

" मग काय लेको, तुमच्या सारखं त्या साहेबाकडे 'गोड तुझें रूप गोड तुझें नाम, देई मज ग्रेड सर्वकाळ' हे भजन कुटीत बसूं ?" तार सप्तकांतला हास्याचा धबधबा फुटायचा. "आपल्या बापजन्मीं नाही जमायची तुमचीं लाचारॉ तोडी" गजाभाऊ एकदम सम गांठायचे.

" तुम्हांलाहि एक दिवस 'तुमबिन मोरी कौन खबर ले' आळवावंच लागणार त्याच्यापुढें–त्याच्या शिवाय तुमची खबर कोण घेणार आहे ?–" बशिलाच तट्टू खिकाळायचं–धृपदधमारासारखं.

" अरे, आतां कसली खबर घेणार आमची? कबर बांधली केव्हांच आमची त्या नतद्रष्टांनी–"ह्या वेळे पावेतों गजाभाऊंचा आवाज तापूं लागतो. इतक्यांत "गुड आफ्टरनुन बुवा . . . " अशी आरोळी ठोकीत डिसूझा येतो.

"गुड नाईट !" गातांना अनवधानानं बेसूर व्हावं तसं गजाभाऊ बेसावधपणं बोलून जातात.

" अहो, दुपारचं गुडनाईट ?" पिंगेचं ऑडिट ऑबजेक्शन–

"ह्या पाववाल्यांना कसली आली आहे रात्र नि सकाळ. तिन्ही त्रिकाळ पाव खातात साले. पाव म्हणजे ह्यांची भैरवी.

केव्हांहि खा, सदारंजनी— "गजाभाऊ पुन्हां मैफलीचा रंग जमवीत. "त्यांची भैरवी, आणि तुमचा कल्याण !" गजाभाऊ कल्याणला रहातात ह्या माहितीवर जुकरचा जोक " छे, त्यांचा गोरखकल्याण—त्यांच्या अमिरी फकिरीला साजेसा" केमिस्ट कलवागचं पृथक्करण. "अगदीं बरोबर. कशासाठीं, पोटासाठीं' हा जीवनपुरींतला तानपलटा घोटून सुद्धां पैसा कांहीं हाती लागत नाहीं तेव्हां आळवतां झालं 'धन धन भाग—' "गोरखकल्याणांतल्या चीजेवर गजाभाऊंची कोटी. "कालच कुणीतरी कोहारी कल्याण रेडियोवर दळत होतं !" टिकेकरची रेडियो संगीतावरची धांवती टीका. "कसला, वोहरी कल्याण ?" रामाणींची 'डेबिट की क्रेडिट' ह्या चालीवरची टिप्पणी. "निवेल बाबा, तसलाहि निवेल !" गजाभाऊंचा घरंदाज गायकींतला विलाप.

"मग तुम्ही कां नाहीं काढीत एखादा कल्याण ?" दळवीची फर्माईश.

"हो, आपला ठाकुर्ली-कल्याण, डोंबिवली-कल्याण !" वालिगाची झलक.

मग एकच हंशा पिके. अशा ह्या वादी-संवादींत लंच टाईम संपायचा. मंडळी आपापल्या कामावर जायला लागत.

"काय बुवा, आतां कुठला राग आळवणार?' कामतचा कुत्सित प्रश्न.

"आत्तांच पुरिया झाला आहे—" दुपारच्या मार्जीपुरीवर गजाभाऊंचा संगीत विनोद.

"मग आतां धनाश्री म्हणा !" पै, नया-पैशाचं कोष्टक सोडविल्याप्रमाणें सुचवी.

"धनाश्री ? बरी आठवण झाली. कॅशरकडे जाऊन ओव्हरटाईमचे पैसे घ्यायचे राहिलेत—" गजाभाऊ त्या दिशेला बूम ठोकीत जायचे.

अशी ही स्वारी—खिलाडू, रंगेल व रसिक ! चाळीशी उलटून गेलेले गजाभाऊ थोरांत व पोरांत पोर म्हणूनच वावरले. कुणाचा दुस्वास नाही, मत्सर नाही. मत नाही, कांहीं नाही. आपल्याच धुंदींत, आपल्याच कैफांत !" काय माटेसाँ" अशी त्यांची टिंगल करण्याचा कोणी आगाऊपणा केलाच तर हे, "तुम्ही लेको असेच कूड. डोकीं आपटा जा त्या बॅलन्स शीटच्या भिंतीवर !" असा शेलका अहेर द्यायचे गंमतीनं-पण मनांत मात्र कांहीं नसायचे. सहकाऱ्यांच्या वार्षिक संमेलनाचे ते प्रमुख मानकरी. संमेलन व गजाभाऊ ह्यांचे संबंध जिवाभावाचे असावेत. संमेलनांतील त्यांची गप्पांची व गाण्याची बैठक बेफाट रंग उधळून जायची. मूळ स्वभाव विनोदप्रिय. स्वानुभवांची झिलई त्यावर चढलेली. तेव्हां गप्पांना, नकलांना एक सार्थ रंग येई—अगदीं चीजेच्या तोलामोलाचा. गाणं बहुरंगी, बहुढंगी तशाच गप्पाहि. प्रसंगानुरूप विनोदाला प्राधान्य असलं तरी वात्रट, चावट, फाजील, अश्लिल अशा अनेक जातीचा विनोद सेवेसी हजर करून सहकाऱ्यांच्या हौशी मनमुराद पुरवीत. गजाभाऊ म्हणजे एक छोटेसं डिपार्टमेंटल स्टोअर होतं, आणि 'कोईभी चीज उठाव' अशी सहाकाऱ्यांना आवाहन करणारी पाटी त्यावर झळकत होती. सहकाऱ्यांचा संतोष हेच त्यांचं ब्रीद. सगळा मामला मुक्त खुषीचा, हर्षाचा—आज मस्त, उद्यां सुस्त ह्या थाटाचा ! जणूं काळजी, चिंता ह्यांनी कॅज्युअल लिव्ह घेतली आहे. त्यांच्या असल्या हरहुन्नरी स्वभावामुळें ते संमेलनाचे हिरो होते. "आ गॅदरिंग गजाभाऊ माटे छे" ही टाईमकीपर मेहता ह्याची गुजरी तोडी अनेक अर्थानें सार्थ होती. रसिका, किती गोड गाऊं ह्या वृत्तीनें एक नाहीं, दोन नाहीं सतत बारा वर्षे गजाभाऊंनी आपल्या सहकाऱ्यांना रिझवलं—संमेलनाच्या रात्री रंगवल्या ! आणि सहकाऱ्यांनी सुद्धां तितक्याच रसिकतेनं त्यांच्या गाण्याची मस्त मजा लुटली—"बिनती करूं मैं तुम मोरे शाम, तुमबिन ना [illegible] चैन." ह्या भावनेनं ! गजाभाऊंच्या सुस्वर कंठांतून निघालेल्या स्वरांनीं त्यांचे काम निवले होते, तृप्त झाले होते ! यंदाच चांदीचा पेला देऊन ऑफिसमध्यें त्यांचा गौरव केला, त्यावेळी त्यांनीं केलेलं भाषण म्हणजे करुणरम्य जोगीया होता. त्या आर्द्र, आर्त स्वरांनीं सुरवातीचं धुंद नि मस्त वातावरण जे बदललं ते परत येईना. सर्वजण स्तब्ध झाले—अस्थिर झाले— अस्वस्थ झाले. खिदळणें, मोठमोठ्यानें बोलणें बंद झाले क्षणमात्र !

"सहकाऱ्यांनीं माझं ऑफिसांत चीज केलं-" हा गजाभाऊंनीं पेश केलेला दर्द माझ्या काळजाला जाऊन भिडला. गजाभाऊंचं ऑफिसांतलं श्रेय हरपलं होतं. चाचपडत, तळमळत गजाभाऊ तें शोधीत होते. त्यांना ते कधींच मिळालं नाही. नादब्रह्मांत गुंग असणाऱ्या गजाभाऊंचे तंबोरे कधीं जुळलेच नाहींत ऑफिसांत ! त्यांची नुसती नोम् तोम् चालू होती. 'बहुत बडी देर' झाली होती. चीज अजून सुरू झाली नव्हती. आम्हां त्यांच्या हितचिंतकांना वाटायचं, आयुष्याच्या उताराला लागलेल्या गजाभाऊंचं कांहीतरी चीज व्हावं. सूर आणि ताल ह्यांच्या मस्तींत रमणाऱ्या गजाभाऊंचं जीवन बेसूर व बेताल कां व्हावं कळत नसे. इन्क्रिमेंट स्केलमधली त्यांची अस्ताई अगदीं ठाय लयींत चालली होती. अंतरा अंतरावर 'इ. बी.'चे अंतरे अडथळे आणीत होते. मग एक विषण्ण विचार मनांत येऊन जायचा, गजाभाऊ म्हणतात तेच खरं. "गाना और रसोई कभी कभी जमता है". ह्यांना ती कधीं जमलीच नाही. अंधार पडेपर्यंत नुसता गंधारच लावला ह्यांनी आणि मैफल रंगेपर्यंत काळ थांबला नाही. गाता गळा व शिपता मळा ह्याऐवजीं गाता गळा व जीवनीं अवकळा असाच बदसूर अनुभव आला त्यांना !

•••

**आतां बोल !**

**एका मुलीनें सैन्यांतील आपल्या प्रियकराला खालील आशयाचें पत्र लिहिलें.**

**"तूं कधीं परत येणार त्याचा नेम नव्हता. येशील कीं नाहीं, तेंहि सांगतां येत नव्हते. म्हणून मी तुझ्या वडिलांशीं लग्न केलें आहे."**

**——तुझी 'आई'**

**देशावरचें संकट अजून टळलेलें नाही. यासाठीं आपल्या निर्धाराची, आत्मबलाची देशाला आज अत्यंत गरज आहे ... !**






अनुक्रमणिका
















अनुक्रमणिका



## नवी मोलकरीण

पान १८ वरून

प्रश्न केला. मी पाठ केल्यासारखें बोललों "न सांगता खाडा करण्याची तुमची रीत; तशी खाडयाचे पैसे कापण्याची आमची रीत. तुमची रीत तशी आमचीहि रीत. आम्ही फार "लिनियप्टली' वागतो म्हणून तुम्ही आमचं अण्डयू अडव्हाण्टेज घेतां !" वगैरे वगैरे. "हें सारं नव्हतं विचारलें." ती शांतपणें म्हणाली व दिलेले पैसे कनवटीला लावीत म्हणाली "एकच रुपया कां कांपला ? हिशेवा-प्रमाणं कापले असते तरी चालले असते !" पैसे व्यवस्थित राहिल्यावर, "उद्यापासून दुसरी बाई बघा तुमची 'रीत' सांभाळ-णारी" असं म्हणून ताड् ताड् निघून गेली; अन् सौ. पार्वतीकाकूंकडे जाऊन मला ऐकूं येईल इतक्या मोठ्यानं बोलूं लागली, "दोन दिवस नाही जमलं यायला, तर पैसे कापतात. कसलीं माणसं हीं देव जाणें ! इतक्या हलक्या मनाच्या माणसांकडे आपुन नाही काम करत. तरी बरं दोघं-दोघं मिळवतात.

"होय तऽऽर !" असा सौ. पार्वतीकाकूंनीं मनःपूर्वक दिलेला दुजोराहि मला ऐकूं आला तरी माझी सौ. नोकरी करते याचें वैषम्य सौ. पार्वतीकाकूंना वाटतें असा माझा अंदाज होताच.

संध्याकाळीं माझ्या वायकोला घरीं येतांना सौ. पार्वतीकाकूंनीं रस्त्यांत अडवून सकाळचा वृत्तांत शब्दशः ऐकवला. "गेली तर जावूं दे" सौ. सात्विक संतापानें पण वेफिकिरी दर्शवीत म्हणाली, "फार शेफारली होती. वाट्टेल तितके दिवस म्हणे ही खाडे करणार नि हिला मग पूर्ण पगार द्यायचा काय ?"

"नाही तर काय हो ?" सौ. पार्वतीकाकू म्हणाल्या "तुम्ही म्हणूनच सहन केलत होऽऽ!"

"मग ? महिन्यांतून सात सात–आठ आठ दिवस ही वया वेपत्ता. ह्यांची वर्षाची 'कॅज्युअल लीव्ह' दोन महिन्यांतच संपली !"

"म्हणजेऽऽ मोलकरीण आली नाही म्हंजे तुमचे यजमान–" एवढे बोलून सौ. पार्वतीकाकू "आलें, आलें" करून आंत वळल्या. आमच्या सौ. देखील घरीं आल्या. पण तो पर्यंत तिच्या संतापाचं नि वेफिकीरीचं 'लक्ष्य वदललं. पर्स टेवलावर टाकून हुश्श करून वसून ती म्हणाली, "शेवटीं केलातच ना घोटाळा ? आतां करतेंच आहे मी सारं—नोकरी करते, स्वैंपाकपाणी करतें नि धुणी-भांडी करते ! तुम्हाला एक साधी मोलकरीणहि टिकवतां येऊ नये ना ?"

"तरी मी अडीजच्या ऐवजी एकच रुपया कापला होता !"

"म्हणजेऽऽ? मोलकरीणहि गेली नि पैसेहि गेले नि हाती काय— खरकटी मांडी ?" असं म्हणून ती कपडे वदलून खरखटया मांडयाकडे (माझ्यासहित) वळली !

कांही दिवसांच्या स्वावलंवनानंतर आम्हांला नवी मोलकरीण मिळाली. ती करार-कॉन्शस




दिसली. "काय त्यो आदी करार असला म्हंजे व्येस होतं. पघा" ती सुरवातीलाच म्हणाली, "मागून खिटखिट विटविट नग व्हायास."

"छे ! छ !! आम्ही खिटखिट करणारी माणसंच नव्हे" माझ्या सौ. ने तिला उत्साहानें उत्तर दिलें. तें ऐकून 'ठीक आहे, ठीक आहे' अशा अर्थी मान हलवून आमची नवी (होऊं पहाणारी) मोलकरीण म्हणाली, "समदी मानसं पहिल्या पावटीं असंच वोलत्यांत. पर करारापरमानं योकजन वागाया तयार नसतो."

"पण मी त्यांतली नव्हेच. पहालच तुम्ही आतां" सौ. जरा रंजीस येऊन वोलली.

"मी अशा मायंदळ पाहिल्यांत न्हव ? मी त्यांतली न्हवे' 'त्यांतली न्हवे' म्हणनारी नेमकी त्यांतलीच असते पहा"

जास्त वोलण्यांत अर्थ नाही असं म्हणून मी तिच्या अटी विचारल्या. पहिली अट म्हणजे ती रोज सकाळीं नऊ ते साडेनऊच काम करणार. सकाळचं खरकटं काढणार व ठरविल्या इतकींच भांडीं घासणार नि कपडे धुणार. तिचा महिन्याचा पगार ॲडव्हान्स पाहिजे (कारण मग पगारावरून 'खिट खिट' नको) सणावाराच्या दिवशीं घरीं केलेलं गोडधोड तिला देऊं नये, तें ती नेणार नाही; मात्र त्यावद्दल रोख पैसे द्यावेत. अमावस्या नि पौर्णिमेला ती उगवणार नाही. त्या दिवसाची धुणी भांडी दुसरे दिवशीं ठेवल्यास त्यांचा डवल चार्ज पडेल.

या अटी मी तावडतोव विनशर्त मान्य केल्या. सौ.ला तें फारसें आवडलें नव्हतें. पण तिच्या स्वावलंवन योजनेंत इतःपर मदत करण्याची माझी तयारी नव्हती.

परन्तु करार मान्य करणें ही एक गोष्ट व तिची अंमलवजावणी करणें ही वेगळी, हें माझ्या दुसरेच दिवशी ध्यानांत आलें. वाई दुसरे दिवशीं वरोवर नऊला कामाला आली. स्वयंपाक घरांत येऊन विटेवरी हात ठेवून म्हणाली, "उष्टी खरकटीं काडायची व्हय का ?"

"हो"

"पन कशी व ?"

"कशी म्हण्जे ?"

"तथं वारतानं तर पडल्याली हायत की"

"तीच घासायची"

"पर ती गोळा करायची वात न्हायी करारापरमानें."

"म्हणजे ?" खरोखरच माझ्या ध्यानांत कांही आलं नव्हतं.

"उष्टी खरकटी काडायची न् भांडी घासायची ठरल्याला हाय करारापरमान. भांडी गोळा करूनशान घासाघसाटीं तुमीच ठिवायची" मला करांतील कलमाचा खुलासा करीत ती वोलली "विगी, विगी आटपा. माजा टायम फुकट जातुया. आमी काय शिकल्यालों नाय् का हापिसात जात नांय्. घाम गळल्याविगर आमच्या नदरेला पैसा पडत न्हाय."

मी तिला डिसमिसच करणार होतो. परन्तु पहिल्याच दिवशीं तिला महिन्याचा






अनुक्रमणिका

हें तो नव्हे क्षत्रिय कर्म । संजया ऐकक्षत्रि धर्म ।।
रणी मारिजे शत्रु अधम । अथवा प्राण देह जे ।।

**मराठींतील पांच नामवंत साहित्यिक**

भारताच्या पूण्यक्षेत्राला

**उत्तर सीमेला भेट देऊन आले....**

**त्यांतील सिद्धहस्त लेखक**

श्री. पु. भा. भावे

**आपला रोमांचकारी अनुभव लवकरच**

दीपावलींतून

**रसिक वाचकांना सांगतील ! ! !**

कधी ........ ! व केव्हां ........ ! !

**यासाठीं 'दीपावली' दर महिन्यास वाचा, म्हणजे सर्व कांहीं वाचल्याचें श्रेय लाभेल ! !**

पगार आगावूच दिला होता. त्यावेळीं ती इतकी आगावू असेल अशी कल्पना नव्हती. अन् त्याहून महत्वाची गोष्ट म्हणजे बोटावर मागत होतें तें जीवावर ओढवून घेण्याचें धैर्य माझ्यांत नव्हतें. मान खाली घालून करारांतील दोन कलमांमधील गाळलेलें काम मी केलें.

ती रोज धुण्याचे कपडे व भांडीं मोजून घेई. एखादे दिवशीं एखाद-दुसरं भांडं जास्त असलं किंवा कपडा असला कीं तें माझ्या निदर्शनास आणी अन् मग जातेवेळीं ज्यादा कामाच्या वहींत माझ्याकडून ती टिपून घेई. भांडं कमी असलं तर ती तक्रार करील अशी मला भीति वाटत असे. तसं होऊं नये म्हणून मी काळजी घेत असें. पण एक दिवशीं माझ्याकडून निष्काळजीपणा झालाच. एक भांडं तिला कमी पडलं. मी वास्तावलों होतों. पण तिनें आक्षेप घेतला नाही. याला अर्थातच माझ्या सुदैवाइतका तिचा चांगुलपणाहि कारणीभूत आहे हें मान्य करावयसचा हवं.

पण महिना अखेरिस ज्यादा कामाचे पैसे तिच्या पगारांतून अधिक झाले ! पण ते सारे कराराप्रमाणेंच झाले होते. माझी सौ. (अन् अर्थात् मीहि) ज्यादा कामाचे तेवढे पैसे द्यायला तयार होईना. "रीतसर काम असेल तें घे. मी नाहीं कुठं म्हणतें ? पण कांहीं तरीच बोलायचं म्हणजे काय?" असा सौ. चा (अर्थात् रास्त) सवाल होता. पण शायलॉकची मातोश्री शोभणारी ती म्हणाली, "आतां है का ? करारापरमानच हाये न्हंव ह्यो ? तुमच्या मालकानींच ह्ये जादा काम लिवून दिलं. त्याचा पैका आतां नको का द्याय करारापरमान !"

"मालकांना समजतं काय—" (डोंबलं हा शब्द सौ. नें गिळलेला मला ऐकूं आला.)

"तुमच्या मालकांना काय समजतं न् काय न्हायी त्याची पंचायती आमासि नगो. मी त्यांतली न्हवे त्यांतली न्हवे असं म्हणत न्हतासा, आतां पैका देण्याची गोष्ट निघाली की हें पक्का होता. पैसा द्यायला ना नाही म्हणतं; कीं करुं न्हंतं पगा ! ! पण सौ. चा स्टँड पण कायत्तरीच सांगायचं म्हणजे काय ?"

"इतके पैसे द्यायचे म्हणजे काय मावांत पडलं? त्यापेक्षां ओला गडी ठेवलेला परवडला. तुला सगळ्या कामांत मदतहि होईल त्याची" मी सौ. ला उद्देशून म्हटलं. हेतु हा कीं मोलकरणीला आपली मागणी किती हायती एक्सेसिव्ह' आहे हें समजाव. सौ. देखील "हो कीं !" म्हणाली. पण अपेक्षित परिणाम झालेला आढळला नाही. ती म्हणाली, "मालक मदतीला असल्यावर दुसरा न गडी मदतीला होयाच कशापायीं ?" रोज केवळ अर्वातास येत असूनहि तिचं निरिक्षण कमालीचं होतं.

आम्ही खूप हुज्जत घातली. पण शायलॉकला भेटलेली सव्वाशेरीण आमच्या मदतीला धावून आली नाही. तिनं आवाज चढवून बोलायला सुरवात केल्यावर आम्ही न बोलतां पैसे (ज्यादा कामाचे) तिच्या हातावर ठेवले. ते डाव्या हाताच्या मुठींत धरून उजव्या हात पुढे करून ती म्हणाली, "आतां चालू महिन्याचा आगावू पगार"

माझी सोशीक पत्नी आता खरंच उसळली नि तिनं (अन् अर्थात् मीहि) त्या आगावू बाईला हात जोडले नि समोरचा रस्ता दाखविला.

प्रत्येक नव्या मोलकरणीच्या नव्या रीतीनं मी फार वास्तावलों आहे. सध्या स्वावलंबन सौ. चें अन् माझी तिला इकडे तिकडे मदत—चालू आहे. मोलकरीण नसणें ही एक समस्या आहे. पण ती सरळसीर आहे अव्वल इंग्रजीतल्या मराठी गद्या प्रमाणें. मोलकरीण असणें ही मात्र गुंतागुंतीची समस्या आहे— 'मग मज्जेचा झाला गुंता' धाटणीची जी नवी मोलकरीण येते ती नवी रीत घेऊनच. त्या मुळें प्रत्येक समस्येची गुंतागुंत ही पृथगात्म, पण परिणामीं मला पराकाष्ठेची परेशान करणारी ठरली आहे. जावें त्याच्या वंशा तेव्हा कळे हेंच खरे ! या दोन्ही समस्या मला (आलटून पालटून) हैराण करीत आहेत. मोलकरीण नसते तेव्हां ती कधी मिळेल नि सरळसोट समस्येतून कधीं मोकळा होईन असें मला वाटतें. नि ती जेव्हा असते तेव्हां एकदा ही काळ करील नि मला या गुंतागुंतीच्या समस्येतून मुक्त करील असा ध्यास जीवाला लागतो !

• • •






*प्रत्येक महिन्यांत घडणाऱ्या अनेक सामाजिक, राजकीय, आर्थिक, सांस्कृतिक, साहित्यिक इत्यादि महत्त्वपूर्ण पण रंजक व गंभीर घडामोडींचें खुमासदार तितकेंच मार्मिक समालोचन करणारे हें नवें सदर....*

# गीतार-हास्य

--अजबराव

**मुंबई** म्हणजे भारताची अनभिषिक्त राजधानी. कॉस्मॉपॉलिटन हें तिचं आंग्ल विशेषण मराठींत 'संमिश्र' असं न सांगतां 'अक्करमाशी' असंच सांगयला हवं. कश्मीरपासून कन्याकुमारीपर्यंत व कच्छपासून कलकत्त्यापर्यंत व्यापाराच्या, कारखानदारीच्या नाड्या तर तिच्याच. यामुळें कामगारवाव मुंबईत बीनीची आणि कम्युनिस्टांचा लालब्रिगाणा दांडगा. कम्युनिस्टांचं तंत्र मोठं लांडग्याचं. वातावरण विनाकारण नेहमी तापतं ठेवायचं. कामगारांचं हित जरी नसलं तरी त्यांना खोटा हितोपदेश करून त्यांना भडकवायचं, चिथवायचं. साहजीकच सरकारी पोलिसांची जिम्मेदारी व्यवस्था व शांततेच्या दृष्टीनें वाढते. मग त्यासाठीं गोळीबार झाला कीं तारस्वरांत गोळीबाराचा निषेध करायचा, प्रसंगी निषेध मोर्चा काढायचा आणि साधूचा आव आणून गोळीबाराच्या न्यायालयीन चौकशीची मागणी करायची. आहे कीं नाहीं हा रंगतवाज लाल कावा, पण जनता आतां एवढी भोळी भाबडी राहिलेली नाहीं. मधुसूदन गिरणीच्या कामगारांवर गोळीबार झाला पण जनतेनें विवेकानं कारणं शोधली. गृहमंत्री ना. बाळासाहेब देसाई यांच्या स्पष्ट व निश्चित आवाहनाला प्रतिसाद दिला. ही घटना महाराष्ट्रांतल्या नव्या वातावरणाची सूचक आहे. राज्यकर्त्या बाळासाहेबांच्या सारखं जनतेलाहि वाटू लागलं आहे कीं पोलिस हा जनतेचा मित्र असला पाहिजे, कामगार नेत्यांनीहि बदलत्या जगाबरोबर बदललं पाहिजे., विध्वंसक कारवाईकडून विधायक कामगिरीकडे वाटचाल केली पाहिजे. बाळोबांना मी हेंच सांगितलं. ते मुद्दां तावातावानं म्हणाले, 'कामगार नेत्यानं रात्रीं दीड वाजतां येऊन हें जमणार नाहीं. बोलवूनहि घटनास्थळीं कामगार नेता आला नाहीं तर त्याची कामगार विरोधी वृत्तीच जाहीर होते. पण म्मी म्हणतो.... म्मी म्हणतो.

'काय म्हणतां बाळोबा?'

'केळयांच्या ऐवजीं हिंदी कम्युनिस्टांनाच कां रशियाला पाठवीत नाहींत?'

बाळोबांचा हा मुत्सद्दीपणा पटेल पण ही एका सच्चा भारतीयाची चीड आहे. एवढं खरं. कोलंबोत वार्ताहर मुलाखतीच्यावेळीं पाकिस्तानी भुत्तोंचा पारा फॅरेनैट सेंट्रीग्रेड छेदून चढला. तसं मात्र बाळोबांचं होत नाहीं. पाकिस्तानी मुत्सद्द्यांना देशीविदेशी राजकारणांत अक्लेची दिवाळखोरी भासते आहे तसं मात्र बाळोबांचं नाहीं. विचार सुचला नाहीं कीं ते मनच्या मनांत ज्ञानदेव, तुकाराम, रामदास आठवतात. आयुर्वेद व ॲलोपथी यांतलं चांगलं तें तें स्विकारण्याच्या स. का. पाटलांच्या सल्ल्याचं मनन करतात. तेव्हां बाळोबांना डॉक्टरांचें औषध चालू होते नि त्यांच्या अर्ध्या अंगाला वैद्याच्या पुड्या सुरू होत्या. रोग आपले त्यांचे त्यांना माहित. त्याची चौकशी प्रतापसिंग कैरॉंच्या जाहीर चौकशीसारखी नको. त्यांनी हिय्या केला आणि पाटलांचे मत स्वतःला पटलेल्या मनस्थितीत डॉक्टरला व वैद्याला सांगितलं- दोघांनी त्यांचा फूटबॉल करून टाकला. सोन्यासारखें औषध तुटलं म्हणून बाळोबांनीं पाटलांच्या नांवानं कपाळाला हात लावला पण खचला तर तो मराठी माणूस कसला. मराठी माणसाचं व्यवच्छेदक लक्षण म्हणजे त्याचं ताठ नाक. ताडकन बाळोबांनी कपाळीचा हात काढला., फाडकन बाळयाला हांक मारली. बाळया हा त्यांचा शाळकरी





अनुक्रमणिका

वारस. नाक ओढत बाळ्या पुढं झाला. वाळोवांनी बाळ्याला फर्मावलं, 'बाळ्या, तुझी महत्वाकांक्षा महामहोपाध्याय होण्याची असो ,नाहीतर....नाहीतर मवाली होण्याची असो, तुला डॉ. झालंच पाहिजे.'

'वहिदा ?' त्यांच्या थोरल्या बाव्यानं विचारलं.

'गाढवा, तुला वहिदाच आठवायची. कुठली सीता, मीरा, मुक्तावाई, जनावाई आठवेल तर हराम. अरे पुढ्यांत तुझा जन्मदाता आहे ऐवढं तरी ध्यानांत घे. माझ्यापुढून जा काळं कर.' बाळोबा संतापून म्हणाले.

'छे छे, ती संधी राजकारण्यांची. मी आपला टेस्ट मॅच बघायला जातो. त्या काळच्या कुंदरननं मद्रासला ओपनिंगला एकशेव्याण्णव रन्स ठोकल्या. विजय मेहरावरोवर इनिंग्ज ओपन कोण करणार असा प्रश्न पडला होता. पण मेहराच फाटकन उडाला, कुंदरन विकेटपाशीं रुतून वसला. बाव्यानं तोंडाचा ज्ञानकोश उघडला.

'ज्जा' वाळोवा कडाडले.

कॉलेज क्वीनसारखी जीभ काढून बाव्या पसार झाला.

वाळोवा पुन्हां म्हणाले, 'बाळ्या, तुला हा वडिलबंधूचा आदर्श नको. तुला डॉ झालंच पाहिजे. पाटलांचं बरोबर आहे. त्यासाठीं वैद्य अधिक डॉक्टर असं झालं नाही तर या आर्यवर्ताची तब्येत बिघडेल. अरे वापाचे वोल अमृताशीहि पैजा जिंकणारे आहेत. मग अंतुल्यांच्यासारखा तुझाहि भव्य सत्कार झाल्याशिवाय रहाणार नाहीं. नव्या पिढीचा तूं तरुण, गुणी, कर्तबगार प्रतिनिधी ठरशील. कुणी सांगावं, मंत्रिमंडळांत आरोग्यमंत्री होशील, आमचा रोग घालवशील.'

वाळोवांचा अनामिक रोग जाईलच पण दारुबंदीसाठीं राष्ट्रव्यापी-सत्याग्रह करण्याचा रोग जनमानसांतून नाहीसा करण्यायोग्य आहे. फॅड. दुसरं काय म्हणावं? सेवासंघाचे सद्स्य घटले म्हणून विनोवांना खेद झाला आहे ना तसंच ! ही सगळी खोटया नीतीची, खोटया विनयाची मिरास, कांक्षा मूळापासून खच्ची करायलाच हवी. हैद्रावादला ही दारुबंदी परिषद झाली. मोरारजीभाई अध्यक्ष अमल्यावर खोटया नीतीची नशा चढायला अवकाश किती ? म्हणे तिसऱ्या योजनेच्या अखेरीपर्यंत देशभर दारुबंदीचा अम्मल जारी झाला नाही तर राष्ट्रव्यापी सत्याग्रह. मग हातभट्टीच्या बाटलीतल्या नवसागरी तीर्थांत देश बुडाला तरी चालेल. अमेरिकेच्या अनुभवानं आपण कशाला शहाणं व्हावं ? कुटिरोद्योगाच्या कर्तवगारीला नवं क्षेत्र तर उघडं झालं ! म्हणजे मागासलेल्याचं झोपडपट्टीवाल्यांचं स्टॅंडर्ड ऑफ् लिव्हिंग आपोआपच गगनभेद करणार ! पण नीतीवाद्यांच्या या स्वप्नरंजनाला महाराष्ट्राच्या मुख्यमंत्र्यांनी नव्या वर्षाच्या पहिल्याच दिवशीं योग्य व कणखर काटशह दिला यावद्दल ते धन्यवादास पात्र आहेत. नीतीवाद्यांच्या कोणत्याहि दडपणाला भीक न घालणारे हे व्यवहारी धोरणच आर्थिक यज्ञाची नांदी ठरणार आहे. साखरवंद्यांचं, बागायतदारांचं भलं करुन कृषिउद्योग समाजाची पायाभरणी करणारं आहे. पक्षाची शिस्त म्हणून महाराष्ट्र सरकार या धोरणाच्या पूर्ण अंमलासाठीं टेकचंद समितीचा अवाहल बाहेर पडेपर्यंत आतां थांवणार आहे. पक्षाची शिस्त जरुर पाळावी पण महाराष्ट्र सरकारनें स्वतःचा निर्णयी विवेक गहाण टाकूं नये. कदाचित असं झालं तर शासनीय घोषणावरचा जनतेचा भरंवसा पार उडेल. या प्रश्नावर श्री. नानासाहेव गोरे म्हणतात तसा महाराष्ट्र–सरकारनं राजीनामा देण्याचा पोरावा मात्र करुं नये.

अहो हें शहाणपण आहे म्हणून तर वाळोवा म्हणतात कीं प्रतिबंधक स्थानवद्धता कायदा तीन काय पांच वर्षांसाठीहि वाढवा पण वैमनस्य पुरे करण्यासाठीं त्याचा दुरुपयोग होताकामा नये. हा कायदा आहे राष्ट्रहितासाठीं आणि हा कायदा वापरणाऱ्या प्रत्येक कृतींत राष्ट्रहिताचीच जाण हवी, राष्ट्रीय एकात्मतेचीच आण हवी.

एका रविवारीं दुपारी पानाला चुना




लावतां लावतां वाळोवांनी मला हटकलं, 'काय रे अजवराव, नेहरुंना राष्ट्रीय एकात्मता हवी ना ?'

'होय. मग ?'

'मग काय ? विगरीन आहेस न कळायला ? अरे मग गोव्याचा प्रश्न, महाराष्ट्राचा सीमावाद चिघळवतात कशाला? एक ना धड, भाराभर चिंध्या. कुठें जैसेथे, कुठें योग्य वेळ नाहीं, कुठें अल्पसंख्यांकांचा नसता खंडोवा. हें अल्पसंख्यांकांचे राजकारण स्वातंत्र्यापूर्वी ठीक होते, व्यवहारी होते, पण आतां नाही. अरे प्रत्येक देशांत अल्पसंख्यांक आहेतच, यांची नसती दांडगाई सहन करुन घरवाल्यानं पाहुण्यालाच घरवाला समजायचे काय ? ही वृत्ति राष्ट्रीय एकात्मतेला पुरी पुरी मारक आहे वघ नेहरू त्रिटिशांचेच डाव स्वकीयाशी खेळताहेत. सीमावादांत नको त्या लोकांचीच लुडबूड चालली आहे. महाराष्ट्राविषयींचा आकस तुडुंबला आहे. निजलिंगप्पा तर खेडे हा घटक मानायलाच तयार नाहीत. त्यांचे बोलविते धनी मोरारजी भाईनी के. के. शाह. तो कृष्णेच्या पाण्याचा तंटासुद्धां तसाच. आतां तूंच सांग राष्ट्रीय एकात्मतेला ही सगळी सुवर्ण संधी आहे नाही ? अरे गोव्यासाठीं वेगळे हायकोर्ट ? आणि इकडे चौपाटीवर भेळ खातां खातां नेहरू सांगतात कीं गोव्याच्या महाराष्ट्रांतील विलीनीकरणांस कॉंग्रेसचा विरोध नाही. गोव्यांतल्या कामगारांना शिक्षण सुद्धां कोंकणीत सुरूं झाले आहे. आतां तूंच सांग






चौपाटीची भेळ आहे, पुणेरी भेळ आहे आणि ही कोणती ? '

' वाळोबा, ही राष्ट्रीय एकात्मता भेळ. तुम्हीपण एकदां ट्राय करा. ' मी सांगितलं.

' कपाळाची ट्राय ! अरे गोव्याच्या मुख्यमंत्र्याना चांगलं फ्राय करताहेत. लिहून ठेव अजवराव, काळ्या दगडावरची रेघ '

' हूं '

' वांदोडकरांना यशवंतरावांच्याच मार्गानं जावं लागेल. आपली शक्ति क्षीण असेल तोंवर होय म्हणावं, शक्ति वाढली कीं सरळ नाही म्हणावं. वाणीचा मात्र साखरेचा कारखाना करून ठेवायचा. कसं ?

' तसंच ' वाळोवांच्या क्लुप्ती चातुर्याचं मला एकदम कौतुक वाटलं. ही सामान्याची चातुरी आहे खरी, स्वतःला शहाणे म्हणविणाऱ्यांनी वाळोवांच्यासारखे जरी ओंठ उघडले तरी बरेंच सावेल.

मी सांगितलं, 'अशी आशा करायला हरकत नाही वाळोवा. पण हें माहित आहे '

काय ? '

' काय रे काय ? ' पिंपासारखं गडगडल्यागत वाळोवांनी उच्चार केले.

' वाळोवा, आशियाई कम्युनिस्टपक्षांचा पेकिंगकडे कल वाढत आहे. भारत, इंडोनेशिया, इंडोचायना, ब्रह्मदेश, सिलोन वगैरे देशांत याचे प्रत्यंतर येते. पेकिंगवाद्यांना मार्क्सवादांत व लेनिनवादांत सुधारणा अमान्य आहे. इंडोनेशियांत तर चीनच्या परराष्ट्रीय धोरणाला पाठिंवा देण्यांत आला. भारतांत तर चीनवादी कम्युनिस्टपक्ष स्थापण्याची तयारी चालली आहे. '

भारताच्या लोकशाहीला हें मोठें संकट ठरणार आहे -अजवराव ' वाळोवाच्या डोळ्यांत मूर्तिमंत गांभिर्य उभं राहिलं.

' क्रांतीकारी डावपेचांनी आशियाई वंशाना चीनने आवाहन केले आहे. आशियाखंडाची भौगोलिक सलगता चीनच्या पथ्यावर पडली आहे. भारतावरील आक्रमणानं भारताची लष्करी शक्ति उघडी झाली आणि त्यामुळं सारा आशिया खिळखिळा करण्यासाठीं आशियाई कम्युनिस्ट पक्ष जागुन उठलेत. '

' अबा वा बा वा, अजवराव, हें सारं असं असूनहि पब्लिक अकांउंटस् कमिटीचे ताशेरे कुणी लक्षांत घेत नाहींत. '

' त्याची खंत नको वाळोबा, कृष्णकारस्थान संपले आहे, यशवंतपर्व सुरुं झाले आहे. यशवंतरावांची लोकसभेवर बिनविरोध निवड म्हणजे त्यांच्या संरक्षण प्रयत्नावर उभ्या भारताचा विश्वास नव्हे काय ? '

' नाही कोण म्हणेल गुलामाचा. पण काय रे अजवराव, नाही नाही म्हटलं तूं वारकाईनं हे सारं वघतोस म्हणून विचारतो ऽ ऽ '

' अडू नका वाळोवा, खुशाल विचारा '

' हजरत वालची चोरी म्हणजे ऽ ऽ '

' फार मोठा डाव होता पाकिस्तानचा वाळोवा. धर्म ही अफूची गोळी आहे हें मुसलमानांच्या वावतींत शंभर पैसे खरं आहे. इस्लाम संकटांत आहे अशी आरोळी ठोकली की कुठल्याहि मुसलमानाचा विवेक ताळ्यावर रहात नाहीं. या धर्मवेडेपणाचाच राजकारणासाठीं उपयोग करुन घेतला जात आहे. हा एक केस नाहीसा झाला कीं आपोआपच गोंधळ माजेल व श्रीनगरच्याच काय पण दिल्लीच्याहि लोकशाही मसनदीला उलथून पाडता येईल ही अपेक्षित करणी. पण कुणाचं वारसं कुणीतरी जेवलेला असतोच भारत-सरकारच्या ताठपणामुळं काश्मीरच्या बाहेर या प्रकाराचा आवाज उठला नाही. केनेडीचा वध झाल्यावरोवर जगांतल्या ठायीठायीच्या अमेरिकी सेनेला होशियारचा हुकूम देण्यांत आला तसंच यावेळीं भारत सरकारनं केलं. यामुळं एक मात्र प्रश्न उपस्थित होत आहे '

' कोणंता, कोणता रे ? '

' व्यक्तिला गांधीवाद झेपेल पण स्वतंत्र राष्ट्राला गांधीवाद झेपेल काय ? पारतंत्र्यांतल्या निर्वलतेला अनुरुप असं गांधीवादाचं स्वरुप तेव्हां फोफावलं पण आतां त्याचा फेरविचार करण्याची वेळ येऊन ठेपली आहे. '

' अरे प्रत्येक गोष्टीच फेरविचार झाला पाहिजे. मानव हा प्रगतीमान आहे. हजरतबाल मिळायचा तो मिळाला पण आपण आपल्याला गवसले पाहिजे. अरे ही खादी म्हणजे खरोखरोज कांहीं लोकांची खादी झाली आहे. बोजा मात्र पडतो आमच्या खिशावर. खादीवोर्ड हवं कशाला ? एका बाजूला अवजड यंत्रोद्योग सुरुं करुन देशाला उर्जितावस्था आणण्याचा यत्न करायचा आणि दुसऱ्या बाजूला हे चरख्याचं नाटक सुरूं ठेवायचं. सगळी विसंगती. अरे खादीवोर्डपेक्षां टेरीन वोर्ड हवं. टेरीन वोर्ड टेरेलीनचं नवं नांव टेरीन होणार आहे वरं कां ! सहा सहा वर्षं वापरावं. धुलाई खर्च नाही कांहीं नाही. नगाला एकदांच तीस रुपये जातात खरे पण केवढं स्वस्त पडतं. अरे टेरीनची निर्मिती पब्लिक सेक्टरमध्यें झाली पाहिजे. यासाठीं वँकांचं राष्ट्रीयीकरण केलं म्हणंजे दुसऱ्या राष्ट्रांच्याकडे दोन्ही हात पसरायला नकोत. एक हात पसरुन भागेल. कॉंग्रेसवाल्यांनी खादी वापरावी. मी म्हणेन त्यांनी वापरलीच पाहिजे. त्यामुळं कार्यकर्त्यातली समानता टिकायला मदत होईल. पण हा इंडायरेक्टली जनतेच्या खिशाला चाट कां ? बोल वोल. उगा कां ? '

' वाळोवा, माझंहि तसंच मत आहे. '

' अरे झोपेतुन उठवून विचारलं तरी तुझं हेंच मत कळलं पाहिजे इतकं हें आजच्या परिस्थितिला फिट आहे.

आसामांत लोंढ्यांनी येणाऱ्या पूर्व पाकिस्तान्यांना तरी आम्हीं कुठं पायबंद घातला आहे ? देशाचीही दशा निराशाजनक नाही अस म्हणण्याचं कुणी धाडस करणार नाहीं. ही सल प्रत्येकालाच जाणवते आहे. आणि आतां तर आसामच्या तेलखाणीच्या व चहाच्या मळ्यांच्या जोडीला सोन्याचे खडक आले आहेत. समृद्धीची त्यांत आशा असली तरी सावधगिरीचा त्यांत इशारा आहे. तस बघायला गेलं तर अवतीभंवती इशारेच इशारे. शिरसगांवने तर तापत्या भाल्याच इशारा दिला आहे. चार वौद्ध स्त्रियांचं विटंवना झाली ती वौद्धेतरांना काळीम लावणारी आहे. या वावतींत वौद्धांच मुंबईत मोर्चा निघाला हे ठीकच; प

अनुक्रमणिका

मुख्यमंत्री ना. वसंतराव नाईक यांनी तातडीने कारवाई सुरुं केली हे लोकांच्या इज्जतीच्या दृष्टीनं आशादायक आहे.

सुस्कारा टाकण्याची वेळ अशोक मेहतांच्यावर आली आहे. एस्. एम्. नी प्र. स. पक्षाच्या दृष्टीनं अगदी खंबीर नि योग्य धोरण स्वीकारलं आहे यांत शंका नाहीं. अशोकना कॉंग्रेसमध्यें जातांना एस्. एम्. हीरो ठरुं देतील असं वाटत नाहीं. अशोकना जर स्वतःच्या बुद्धीचा उपयोग देशाला करुन द्यायचा असेल तर त्यांनी त्रिशंकूची अवस्था सोडावी. प्र. स. पक्षाचं सदस्यत्व कायम ठेवून अशोकनी नियोजन मंडळाचं उपाध्यक्षपद स्वीकारण्यांत पक्षाचा मानबिंदू खचित ढळणार आहे. हा अशोक मेहतांचा डाव त्यांच्यावरच उलटल्याशिवायच रहाणार नाही. प्र. स. पक्षाच्या शक्तिवर सहकार्याचा पत्ता पुढे सरकवून स्वतःचा हुकूम कॉंग्रेसमधें प्रस्तापित करणं अशोकना अत्यंत अवघड जाईल तसं केल्यास त्यांची दुसरीकडेहि रेवडी उडेल. त्यांनी वेळीच सावध व्हावं. राष्ट्रीय राजकारणाचा नांवाखाली व्यक्तिगत राजकारण खेळण्याचं त्यांनी सोडावं. प्र. स. पक्षाच्या राजीनामा देउन त्यांनी उजळ माथ्यानं कॉंग्रेस प्रवेश करणं उचित ठरेल.

उचित काय आणि अनुचित काय ! जनतेची भीड नसेल तर राजकारणाला अर्थच उरत नाही. भुवनेश्वरचं शाही इतमामांतील कॉंग्रेसचं अधिवेशन व्हायला नको होतं तसं झालं. सत्ताधारी पक्षाच्या अधिवेशनाला सरकारी यंत्रणा व साधनसामुग्री वापरली जाते यामुळें भारतीय लोकशाही बाळसेदार होण्यापेक्षां ' रिकेटिव्ह' बनत जाईल. मग रशिया चीनला हंसण्यांत हंशील काय ? हल्ली समाजवादानं जो तो पछाडला आहे. समाजवादाला लोकशाहीचं अस्तरहि लावण्याचा यत्न चालला आहे. पण या विचारांच्या पलिकडेहि पश्चिम जर्मनी व ब्रिटन यांत आज कांहीं घडत आहे इकडे विचारवंत धुरिणांनी पाठच फिरवलेली दिसते. भारतांत समाजवादाचा अर्थ जो तो स्वतःच्या सोयीप्रमाणें लावण्यांत गढलेला आहे, तोच अर्थ कॉंग्रेसवर लादण्यांत दंगलेला आहे. याचं मुख्य कारण असं कीं भारतांतली स्वतंत्र समाजवादी चळवळ अयशस्वी ठरली आहे. तेव्हां आपआपल्या पोथीप्रवृत्तीसाठी ज्यांनी त्यांनी कॉंग्रेसच्या अवाढव्य पोटांत शिरकाव करुन घेतला आहे. तरी कॉंग्रेसचं हें बदलतं स्वरुपच भारताचा चेहरा मोहरा बदलायला समर्थ ठरणार आहे हें निःसंशय.

अशा ऐतिहासिक अधिवेशनांतवर नेहरूंच्या आजाराची सांवळी छाया पडली. कांहींनी अफवा उठवली कीं नेहरूंचा हा राजकीय आजार असावा. पण अशा अफवावहाद्दरांना देशाचं मन कळलेलं नाही. कॉंग्रेस नको म्हणणारे लोक नेहरु हवेत म्हणतात हें सत्य आहे. जगांतल्या राष्ट्रप्रमुखांना नेहरूंच्या आजाराची वार्ता त्वरित त्यांच्या राजधानींतून कळविण्यांत आली. ब्रिटनचे होम तर तेव्हां त्यांच्या मतदार संघात होते. हें असं कां ? तर अजूनहि जग 'केनेडीवधाच्या पोकळींत स्वतःचा तोल सांवरण्याचा प्रयत्न करीत आहे. कुणाला काळजी वाटली नाही तरच नवल. भारताला त्यांच्या सगळया चुकासहित हवी असणारी एकच व्यक्ति आहे. आणि ती म्हणजे नेहरू. सतत काम नि भरपूर काम. ध्यास फक्त भारताच्या उत्कर्षाचा. यामुळें त्यांनी स्वतःच्या आयुष्याचाहि कधीं विमा उतरला नाही. त्यांनी स्वतःची अस्मिता खर्च केली आहे ती भारताचा विमा उतरण्यासाठीं.

टीका केली तरी बाळोबांच्या मनांत नेहरूंच्या बद्दल फार फार आदर आहे. नेहरूंच्या आजाराच्या वार्तेनं त्यांचा सारा हुरुप मावळला. मी त्यांना म्हटलं, 'बाळोबा, हुरुप तर नेहरूंच्यापासून उचलायचा आणिऽऽ'

'पुढं बोलूच नका'

'कां ? अहो मी तर नेहरू बॅटिंग करायला निघालेत तो फोटो तुम्हांला दाखवतोय बघा....बघा....'

'वंडरफुल. हा फोटो बघून हुरुप जागा झाल्याच पाहिजे अजबराव.'




आणि मग बाळोबा फुटाण्यासारखे उडायला लागले. हनुमंतासिगनं दणकेबाज टेस्ट डीवरचं शेपूट आपटलं तसं करुं लागले. घसा घॉं घॉं घॉं घॉं करुन म्हणाले,

'अरे, आतापर्यंत झालेल्या तीन टेस्टमध्यें पतौडीचा नवाब आपली कसब दाखवूं शकला नव्हता ना, पण त्याने चौथ्या टेस्टेत मात्र दिल्लीचा कुतुबमिनार असा दणाणून सोडला म्हणता की बस. अरे रेकॉर्ड ब्रेक सॅंच्युरीचा... अगदीं धमाल उडविली बेटयानं. मात्र आमचा रमा...अगदींच.... अरे यंदा रमाकांत देसाय जरी फार्मांत नसला तरी आपले वीणाकार ठोमरे लई टेचांत आहेत.'

' म्हणजे ? पाइपांत तंबाखूच होता...

' विनोद लाइज हियर .. अजबराव..

बाळोबा म्हणाले आणि माझ्या हंसण्याची वाट न बघतांच राजाबाई टॉवरसारखे हंसले. मला हंसूच आलं नाही. त्यामुळें मात्र बाळोबा भडकले. त्यांचं सांत्वन करण्याच्या सुहेतूनं मी म्हणालो, 'बाळोबा, तुम्हीं एवढे भडकोबा कां होतां ? अहो ठोमऱ्यांची ठुमरी बेसूर नाहीं हेंच ठीक आहे. सेक्स बदलतं तशी विनोदाच्या इंद्रियाची उलाढाल करता आली तर काय बहार होईल !'

'कवळी सारखं शरीरांत हें इंद्रिय कुठंतरी बसवून घ्यायलाच हवं. आज विनोदाच्या अणूपरमाणूंची गरज आहे. तुला मला देशाला जगाला विश्वास . . .

आणखी . . . आणखी . . . जावू दे झालं. ऑर्डनन्स फॅक्टरींत त्या कृष्णमेननं कॉफीचं यंत्रं न बनवता विनोदाची इंद्रियं बनवली असती तर . . . '

' तर काय ? . . . '

'पुढचं ठोमऱ्यांना माहित. '

' तसं त्यांना बरंच माहित दिसतंय. म्हणून तर त्यांनी 'एक हाती टाळी'ला मोका साधून तिसरा हात लावला.'

' अँ ?'

' अँ काय ? एक हात मंत्र्यांचा, दुसरा हात रायकरांचा, तिसरा हात ठोमऱ्यांचा '

' द्या टाळी. अरे ही इज संपादक '

मी टाळी दिली नाही. ठोमऱ्यांच्यासारखा मी विनोदांत गंभीर होण्याचा खटाटोप करून म्हणालो, 'ठोमरे देतात हचुमर. पण मराठी माणूस विकत घेतो विट. अत्र्यांच्या बवबव्यानं विट म्हणजेच हचुमर असा गैरसमज होवून बसलाय मराठी माणसाचा. मराठी माणसाची वृत्ती ही अशी आहे तोंवर ओल्डटेस्टॅमेंटमधल्या वचनांचीच ठोमऱ्यांना साथ घ्यावी लागणार. महाराष्ट्रांतल्या विनोदावर उठलेले गारदी हा एक संशोधनाचा विषय आहे !'

' पी. एच्. डी. मिळेल ? '

' मात्र खिडक्यादारांचा तिटकारी विनोद टाळा. '

' मग एकदम वेडो. ' हंसतां हंसतां त्यांचा आवाज चढला.

विनोदांतून वाळोबांना शुद्धीवर आणण्यासाठीं सुरक्षा मंडळांतील छगलांच्या भाषणाची मी शॉक ट्रीटमेंट दिली. तेव्हां वाळोबा म्हणाले, 'मुसलमानाला उत्तर द्यायला भारतानं मुसलमान उभा केला . . मग तो भुत्या संतापेल नाहीतर काय ? यवनांचा नि विवेकाचा पिढीजाद वाकडेपणा. म्हणे द्वीराष्ट्रवाद ! या जगांत फक्त आहेत राज कारण्यांचे संसार. गरीबांचे संसार आहेत कुठं ? हिमालयांत निघुन जावंसं वाटतं ! पण तिथं तरी शांती कुठांय ? तोहि शांतीसाठी पेटलेला. तिथं आमचा काय पाड ? '

' तिथंच तुमचा पाड आहे वाळोबा. तुम्ही स्वत:ला कमी कां लेखता ? बालगंधर्वांचं लक्षांत घ्या. '

' खरं खरं अजवराव. सरकारनं कलेला मुजरा केला. बालगंधर्वांच्या सप्तभूमिकांनी त्यांना ओवाळण्यांत मोठं औचित्य होतं. जिवंत मराठी रसिकतेचा हा अमृत-महोत्सव असंच म्हणायला हवं. मराठी माणूस जेवढा ताठ, त्याच्या दुप्पट कृतज्ञ. कलेच्या दरबाराला भिंती नसतात हें शिवाजी गणेशन, पृथ्वीराज कपूर यांनी दाखवलं . . . मण मामा वरेरकरांनी अनुपस्थित राहून एवढा करंटेपणा कां करावा ? कांहीं म्हण अजवराव, दिल मोकळं हवं अत्र्यांच्यासारखं.'

वाळोबांचा दाटलेला आवाज उमजून मी माझ्या हात रुमाल त्यांच्यापुढं केला. घेउन त्यांनी तो डोळ्यांना लावला . . . म्हणाले, ' अजवराव, आम्ही जन्मलो, आम्ही पाहिलं, आम्हांला आठवतं. भाग्य आमचं कीं आम्हीं पृथ्वीवरल्या भारतांत, भारतांतल्या महाराष्ट्रांत जन्मलो . . . '

' वाळोबा, वाळोबा आतां तुमच्या रक्तदाब वाढेल पडून रहा कसे . . .

'पडायलाच हवं. आम्ही काय नेहरू आहोत ?'

●●●








STUDIO SARJERAO




निरोगी व बाळसेदार मुलें सर्वांनाच आवडतात, म्हणूनच त्यांना दृष्ट लागते असे म्हणतात ! मुलांना कॅलशम व्हिटॅमिन डी भरपूर प्रमाणांत मिळालें तर त्यांच्या शरिराची वाढ चांगल्या प्रकारें होते, हाडांना मजबूती येते, दांत सुलभपणे येतात, रक्ताची वाढ होते. आणि शरिरांतील प्रतिकारशक्ती वाढतात, बालक सुदृढ होतें. साण्डु रिकेटयूर यासाठीं अत्यंत उपयुक्त आहे

साण्डु

रिकेटयूर

मुलांना वेळींच द्या



दत्तात्रेय कृष्ण साण्डु ब्रदर्स, चेंबूर, प्रा. लि.
चेंबूर – मुंबई




**खुरखुरीत, खुसखुशीत आणि खमंग फरसाण**

● ● ● ● ● ● ● ● ● ● ● ● ●

## नवऱ्याकडे आगपेटी मागणे

वायकांची ही एक नवऱ्याला अतिशय चीड आणणारी अशी संवय आहे. वास्तविक आगपेटीसारखी क्षुल्लक गोष्ट. एक आण्याला मिळणारी. पण ती नेमकी त्या घरांत ठेवणार नाहींत. 'जरा तुमची पेटी द्या हं !' त्या नवऱ्याकडे येऊन म्हणतील. माझी वायको माझ्याकडे पेटी मागते म्हणून मला चीड येत नाहीं. थोड्यावेळानें ती परत येऊन पेटी माझ्या पुढयांत टाकून म्हणते, 'हं. घ्या तुमची पेटी' असं वाटतं एक कानफटांत वाजवावी. म्हणे घ्या तुमची पेटी. परत आणून दिली नाहीं तर जशी जगबूड होणार आहे. या बावतींत मी घरांत अनेक प्रयोग करून पाहिले आहेत. एकदां घरांत डझनभर पेटया आणून ठेवल्या. पण त्या संपल्यानंतर पुन्हां सुनंदा माझ्याकडे आलीच. 'जरा तुमची पेटी द्या हं !' मग मी एक ग्रोस पेटया आणून ठेवल्या. एक ग्रोस आणण्याचा माझा विचार होता. पण वरेच दिवसांत सुनंदानें माझ्याकडे पेटी न मागितल्यामुळें तो गोष्ट मी साफ विसरून गेलों. सुमारें सहा महिन्यानंतर वाईसाहेव पुन्हां माझ्याकडे आल्या. 'जरा तुमची पेटी द्या हं !' आणि थोडया वेळानंतर, 'ही घ्या तुमची पेटी !' (वाजाची असती तर डोक्यांतच मारली असती !)

* * *

## नेहमीं मीच

एका माणसाच्या शंभराव्या वाढदिवशीं त्याच्या एका चाहत्यानें त्याला त्याच्या दीर्घायुष्याचें रहस्य विचारले.

" माझ्या लग्नाला पंचाहत्तर वर्षें झालीं." तो म्हणाला. "लग्नाच्या पहिल्या रात्रीं आम्ही एक करार केला. 'आपलें जेव्हां जेव्हां भांडण होईल तेव्हां ज्याची चूक असेल त्यानें उघडया हवेंत मैलभर फेर-फ़टका करून यावयाचें. मित्रहो, गेलीं पंचाहत्तर वर्षें मीच सतत उघडया हवेंत फिरतो आहे."

* * *

## अहो, पण जेवत नाही–!



एका धनवान गृहस्थाला अगदी अनपेक्षितपणें एका गांवांत थांबावें लागलें. त्यावेळीं वहुवा सर्वच उपहार गृहें बंद झाली होती. म्हणून त्या विचाऱ्याला शेवटी एका अगदीच फडतूस हॉटेलांत जेवण घ्यावें लागलें. तो जेवण करीत असतांनाच, तेथें नोकर असलेला त्याचा एक वालमित्र भेटला. त्याला डिवचण्याच्या उद्देश्याने तो श्रीमंत मित्र त्याला म्हणाला, "अरे, ! तूं या फडतूस हॉटेलांत नोकर आहेस !"

"हो, आहे खरा; पण तुमच्या सारखा जेवत नाही या हॉटेलांत" तो शांत पणें उत्तरला.

पण या श्रीमंत मित्राचा मुखवटा कसा झाला असेल वरे...?

## आयताच सांपडला

एक लठ्ठ माणूस स्टेशनवरील एका वांकावर गाढ झोंपला होता. त्याचें पाकीट काढण्याकरतां एका चोरानें त्याच्या खिशांत हात घातला. तेवढयांत तो माणूस झोपेंतच कुशीवर वळला. तेव्हां त्या चोराचा हात त्याच्या अंगाखालीं सांपडला. तो त्याला काढून घेतां येईना. दोन पोलिसांनीं येवून त्याची त्या अवस्थेंतून सुटका केली आणि लगेच त्याला अटक केली.

* * *

## अनिर्णयी व्यक्ती

ज्यूरीवर नेमणूक करण्यासाठीं एका माणसाची चांचणी घेण्यांत येत होती.

"तुमच्या मालकीची कांहीं मालमत्ता आहे ?"

"होय, युअर ऑनर."

"लग्न झालंय तुमचं ?"

"पांच वर्षांपूर्वी झालं, युअर ऑनर."

"तुम्ही आधींच कुठला निर्णन घेतला आहे किंवा व्यक्त केला आहे ?

"गेल्या पांच वर्षांत तरी नाहीं, युअर ऑनर."

* * *

## नवऱ्याची फार फार काळजी घेणें:

वायकांनीं नवऱ्याची काळजी जरूर घ्यावी. त्यांचें तें कर्तव्यच आहे. त्यावद्दल कांहीं म्हणें नाहीं. पण त्या जेव्हां 'फार फार' काळजी घेऊं लागतात तेव्हां मात्र नवऱ्याला जीव अगदीं नकोसा होऊन जातो. माझें कधीं डोकें दुखूं लागलें तर मी सुनंदाकडून पेन वाम मागून घेतों आणि कपाळाला चोळतों. पण 'माझें डोकें दुखतंय' एवढें तिला कळलें कीं वस्स ! अशी धांवपळ सुरूं करते कीं एखाद्याला वाटावें, डोकें दुखणें हा एक फार भयंकर असा आजार आहे. "मी चोळूं का वाम कपाळाला ?" (कां ? माझे हात काय मोडले आहेत ?) ॲनासिनची गोळी देऊं का ? (कां ? वामने नाहीं मागत ?) कॉफी करून देऊं का गरम-गरम ? (म्हणजे मला नको असली तरी ?) कांहीं विचारूं नका. शेवटीं असें वाटतें कीं ती डोकेदुखी परडवली पण हें फार फार काळजी घेणें नको. ● ● ●




## आजची–उद्याची मराठी कथा -सारस्वत

**नोव्हेंबर** महिन्याच्या 'सत्यकथेच्या' अंकांत वामन प्रभू यांनी आजच्या मराठी कथेवर एक टीप लिहून एका महत्त्वाच्या विषयाकडे रसिकांचें, टीकाकारांचें व कथा-लेखकांचें लक्ष समर्थपणें वेधून घेतलें आहे. आजच्या लघुकथेला झालें आहे तरी काय, याचें निदान करण्याचा त्यांनी यशस्वी प्रयत्न केला असून, त्या रोगावर कांहीं जालिम इलाज पण त्यांनी सुचविलें आहेत. त्यावरच उद्यांच्या लघुकथेची निकोप प्रकृति ठरणार आहे, असेंहि त्यांनी निक्षून म्हटलें आहे. 'मराठी कथेला आज कांहीं वेगळे-पण हवें हें निश्चित' असें विधान करून ते असेंहि एक विधान करू शकले आहेत. ते म्हणतात, 'काळावरहुकुम धांवत असलेली कथा एके दिवशीं आपलें आजचें रूप पालटणार असें इतिहासावरून आपण म्हणूं शकतो..' आणि म्हणूनच कथेचें हें पालट-णारें स्वरूप कसें असेल हा एक प्रश्न त्यांच्यासमोर उभा राहतो. आजपर्यंत मराठी मन कोणत्या संघर्षांत कसें ओढलें गेलें याचें वामन प्रभूकृत विवेचन सखोल व सुस्पष्ट आहे. त्यांचें म्हणणें असें, 'अधिका-धिक यांत्रिकतेमुळें व झपाट्यानें होत गेलेल्या विचारांच्या बदलामुळें आजच्या मराठी मनाला एक प्रकारची उदासीनता सर्वत्र दिसून येत असल्याचें जाणवलें आहे. जीवन एका, कुठेंहि ध्येय नसणाऱ्या आंखीव मार्गानें जात आहे.... शहरांतून तर ही गोष्ट प्रकर्षानें जाणवते. जीवनावरील श्रद्धे-पेक्षांहि आजच्या सर्वसाधारण माणसाची श्रद्धा, येणाऱ्या एका तारखेवर अधिक असल्याचें प्रत्ययास येतें. नाण्यांच्या अधिक्या-वरहुकूम चांगलें वा अधिक चांगलें 'जीवन जगण्याच्या' कल्पना मराठी मनांत खोलवर रुजत चालल्या आहेत. आणि प्रत्यही ही रुजवांत अधिकाधिक खोलवर होत आहे. आजची मराठी कथा एवढ्याच एका संघर्षांतून जात आहे. मराठी कथेंतून रसरशीत जीवन ह्यामुळेंच कदाचित् पाहण्यास मिळणें अशक्य झालेलें असावें.' कलानिर्मितीची कांहींशीं स्थूल चर्चा करून ते पुढें म्हणतात, 'भाषांची बंधनें तोडून कुठेंहि फेकल्यास उभी राहूं शकेल व चमकेल अशी कथा लिहिली जात नाहीं...' त्यांतल्या त्यांत मोठ्या प्रमाणावर आढळ-णारें पोशाखी मन (आज तरी हेंच एक एकमेव मन मराठी कथा वाचतें, पोसतें आणि टाकतेंहि ) अत्यंत संकुचित झालेलें आहे, निःसत्त्व झालेलें आहे आणि त्या संकुचित प्रवृत्तींत आजचा मराठी कथा-कला-वंत वाढतो आहे व पोसला जात आहे. ह्या साऱ्यांचा एकसंघ परिणाम म्हणजेच आजची मराठी कथा.' वामनप्रभू आणखी पुढें जाऊन लघुकथेबद्दल म्हणतात, 'अनावश्यक भाग सोडून मराठी कथा सूक्ष्म होत गेली, आणि ती आतां आत्मकेंद्रित झालेली आहे...मनोविश्लेषणाची तर मराठी कथेला नशाच चढली आहे. लहानसा अनुभव घ्यायचा व फिक्कट रंगांत तो रंगवायचा ह्यांतच मराठी कथाकलावंत कामास येत आहे....'

अशा रीतीनें रोगाचें निदान करून झाल्यावर वामन प्रभूंनीं कोणत्या 'वळणानें वळण्यांत' मराठी कथेचें 'निरोगीपण व तिची शाश्वताहि आहे...' हें प्रतिपादन केलें आहे तें असें—

(१) मराठी कथाकारांनीं हें, ठिपके वेचण्याचें काम थांबवावें.

(२) ह्या लहान ठिपक्यांचें नातें ते ज्या मोठ्या फलकावरचा एक लहानसा भाग आहेत, त्याच्याशीं दाखविलें गेलें पाहिजे.

(३) जीवनाचा वेध घेणारे कला-वंतांचें व्यक्तिमत्व तेवढ्याच कलात्मक-तेनें कथांतून उठून दिसणें खासच आवश्यक आहे.

(४) त्याकरितां कलावंताला जीवन-विषयक पक्का असा स्वतःचा विचार असणें आवश्यक आहे.

(५) कथाकाराला काय म्हणावयाचें आहे हें रसिकांना—न समजणें म्हणजे यशस्वी कथा, हा अत्याधुनिक विचार बेजबाबदार-पणाचा व चीड आणणारा आहे

वामन प्रभूंनीं केलेली ही आजच्या-उद्यांच्या मराठी कथेची चिकित्सा स्वागतार्ह आहे. त्यांच्या म्हणण्याशीं सर्वार्थानें सर्व-जण सहज सहमत होतीलच असें नाहीं. उदाहरणार्थ आजच्या व विशाल अर्थानें उद्याच्या पण कथावाचकाचें 'पोशाखी मन' वर्णन करतांना त्या मनाचें 'प्रभू' निर्मित वर्णन कांहींसें अतिरंजित, अवास्तव व महाराष्ट्रांतील केवढ्यातरी मोठ्या वाचक-वर्गावर अन्याय करणारे वाटतें. हें पोशाखी मन अत्यंत संकुचित व निःसत्त्व झालेलें आहे हें प्रभूंचें म्हणणें त्यांच्याच कसोटी-वर तपासायचें ठरविलें तरीहि तें खरेंच आहे असें म्हणतां येईल काय? आजच्या मराठी कथेचा प्रभू वर्णन करतात तो रोगटपणा कांहींसा कटाक्षानें वाढीला लाव-णाऱ्या तथाकथित चोखंदळ व 'अत्याधुनिक' कथा–मासिकांचा वाचकवर्ग केवढासा आहे? उलट ज्या मासिकांतून कथा ही केवळ बरीचशी कथा असते, मानवी मनो-व्यापाराचें फार सूक्ष्म नव्हे पण वरेंचसें स्थूल व प्रभूंना हवा त्या 'रसरशीतपणा'चें चित्रण करणारी कथा देणारीं मासिकें आजचा मराठी कथा वाचक अधिक हव्या-






सानें व बहुसंख्येनें वाचीत नाहीं काय? आजच्या कथेचा 'अतिसूक्ष्मपणा' व 'विश्लेषणाची नशा' हा कथेचा खरा रोग आहे कीं सूक्ष्मपणाच्या नांवाखालीं, अतिसूक्ष्म 'विकृति' व वेढब 'नंगे'पणा हा आजच्या कथेचा खरा रोग आहे? संकुचिततेचा आरोप हा वाचकांच्या बाबतींत अधिक खरा आहे कीं प्रत्यक्ष कथालेखकांच्या बाबतींत? कथावाचकांचें मन निःसत्त्व झालें आहे हें कशाच्या आधारावरून प्रभू म्हणूं शकतात?...वगैरे किती तरी उचित प्रश्न या संदर्भांत सहज उपस्थित होऊं शकतात...

पण असें असलें तरी प्रभूंनीं अन्यथा मराठी कथेच्या शरीरप्रकृतीला झालेला रोग अचूक दाखविला आहे, नाडीपरीक्षा नीट व नेटकी केली आहे, असेंच म्हटलें पाहिजे. खरा रोग तसें पाहिलें तर मराठी कथा–लेखकाला (कीं कलावंताला) झाला आहे? भावे गोखले, गाडगीळ, माडगूळकर यांनी कांहीं वर्षांपूर्वीं मराठी कथेला एक नवें वळण दिलें असें म्हटलें जातें, तें बहुशः खरें पण आहे. त्यांच्या कथांतून मराठी मनाच्या रोगट व निरोगी अशा दोन्ही प्रवृत्ति उफाळून व उधाणून वर आल्या. पण तेवढेंच त्यांचें कार्य होतें व तें तितक्याच उदासीनपणें संपलें नाहींना अशी शंका येण्याइतपत या कथालेखकांची आजची कथा केविलवाणेपणानें स्वतःचीच नक्कल निर्जीवपणें करीत मराठी वाचकांसमोर येत आहे, असें वाटतें. प्रभ म्हणतात त्याप्रमाणें, 'कलावंताचा जीवनविषयक स्वतःचा पक्का असा विचार' वरील कथाप्रभूंच्या बाबतींत मर्यादित व अल्पजीवी ठरला. प्रा. शरश्चंद्र मुक्तिबोध जेव्हां 'आजची मराठी कथा' 'सेल्सरेप्रेझेंटेटिव्ह' सारखी झाल्याचें म्हणतात, तेंव्हां लक्षणार्थानें आजचा कथा लेखकच एकप्रकारें 'सेल्समन' झाला आहे हें त्यांना सूचित करावयाचें असावें. आमच्या आजच्या मराठी कथालेखकांचें अनुभूतीचें विश्व प्रामुख्यानें शहर हेंच आहे. आणि त्यांतहि आपल्या सुखद बंधनांत स्वतःला स्वेच्छेनें बांधून घेऊन न कळत्या दुःखाचा व विफलतेचा भकास व कृत्रिम आभास आपल्या कथांतून आवर्जून निर्माण करणारा लेखक, उदासीनतेची उसनी अवकळा स्वतःवरच लादून घेतो व पर्यायानें ती वाचकावरहि लादतो. म्हणूनच कथेला पांढरपेशी व बनावट (Snobbish) रक्तपितीची रोगट अवस्था प्राप्त होते. शिवाय कोणतीहि कलाकृति जेव्हां वळणा–वळणाने विकासक्षम होत जाते, तेव्हां ती पुष्कळदां आडवळणानेंच जाण्याचा धोका असतो व कदाचित् निश्चित अर्थानें ती एका दुष्ट वर्तुळांतच अडकून पडण्याचा दारूण संभव उद्भवतो. 'काळाबरहुकूम धांवत असलेली कथा एके दिवशीं आपलें आजचें रूप पालटणार' असें प्रभूकडून केलें जाणारें विधान आशादायक वाटतें खरें, पण तें स्वानुकूल विचारसरणीचें (Wishful Thinking) गमक वाटतें. काळाबरहुकूम धांवणारा कथालेखकच कलाकृतीचें आमूलाग्र उत्सर्जन करूं शकतो व नवयुग (Epoch) निर्माण करूं शकतो. फिरकोळ कणाकणांच्या अनुभूतींतून, अनुत्कटतेनें, पण मागणीप्रमाणें मणामणाची कथा आज ज्या पद्धतीनें व पैदासीनें लिहिली जात आहे, व ती तशी लिहिली जाण्याला जोपर्यंत सार्थ उत्तेजन मिळतें आहे, तोपर्यंत 'एके ठिकाणीं थांबलेला कथेचा हा प्रवाह' अधिकच थिजत व कुजत जाणार व दिवसें दिवस घडीघडीच्या व घडामोडीच्या वेगानें बदलणाऱ्या जीवनाशीं प्रत्यक्ष संघर्ष करीत जीवन जगणाऱ्या कथावाचकाला जीवनपरावृत्त कथा लेखकांच्या 'संकुचित व निःसत्त्व' अविष्कारालाच असहाय्यपणें कथा म्हणावें लागणार अशीं उदासीन चिन्हें स्पष्ट नजरेला येत आहेत. ●●●

# अस्सल 'गोमंतवाणी' बोलूं लागली

**गेल्या** प्रजासत्ताक दिनीं 'गोमंतवाणी' या नांवाचें नवें दैनिक मडगांव गोवा येथून प्रसिद्ध होऊं लागलेलें आहे. 'मराठी व विलिनीकरण यांचा स्पष्ट पुरस्कार', हें या दैनिकाचें घोषवाक्य आहे. वास्तविक चार भाषांतून अनेक दैनिकें तिथून प्रसिद्धिलीं जात असतांना आणखी एका नव्या दैनिकाची भरती कशाला? असा प्रश्न कुणाहि त्रयस्ताच्या मनांत उद्भवणें स्वाभाविक आहे; परंतु जीं वृत्तपत्रें आज तिथें चालू आहेत त्यांतील कांहीं एकतर्फी आहेत; कांहीं पक्षप्रचारी आहेत; आणि बाकीच्यांना सडेतोड विचारांची बाजू आणि निस्पृहपण बिलकुल नाही. गोमंतकांत आज अनेक पक्ष आणि संविसाधु लोक सामान्य जनतेची दिशाभूल करून तापल्या तव्यावर आपली पोळी भाजून घेण्याच्या तयारींत आहेत. अशा संविसाधूंचा आणि पावसाळ्यांत उगवणाऱ्या कुत्र्यांच्या छत्र्यांसारख्या पक्षांचा विमोड करून निरलसपणें जनतेची सेवा करणारे; आणि गोमंतक हा महाराष्ट्राचा अविभाज्य घटक आहे हें छातीठोकपणें सांगणारें असें एक दैनिक तेथें हवेंच होतें. गोमंतवाणी ती तूट भरून काढील यांत संदेह वाटत नाहीं.

जी गोष्ट सूर्यप्रकाशाइतकी स्पष्ट आहे ती खोटी ठरवूं पहाणाऱ्या नालायकांची आज गोव्यांत बजबजपुरी चालू आहे. कांहीं आपमतलबी लोक त्यांना पाठिंबा देऊन फार मोठा राजकारणी डाव खेळत आहेत. त्यांत त्यांचे स्वतःचे हितसंबंध गुंतलेले आहेत. अशा लोकांची काळींबेरी गुप्त कृत्यें कोणत्या स्वरूपाची असतात हें बिचाऱ्या तेथील सामान्य जनतेला काय माहिती! गोमंतवाणीनें ती वस्तुस्थिति निर्भयपणें उघड केली पाहिजे. प्रसिद्ध इतिहास संशोधक श्री. पांडुरंगराव पिसुर्लेकर यांनी गोमंतवाणीच्या पहिल्याच अंकांत एक लहानसेंच पण मोठें महत्वाचें पत्र लिहिलेलें आहे. १५१५ ते १५४० या कालावधींतील पुर्तुगेज लेखकांनी लिहून ठेवलेली ती माहिती वाचून गोव्यावरचा मराठी हक्क स्पष्ट होतो. शतकानुशतकें गोमंतक महाराष्ट्राशीं सर्व बाजूंनीं एकजीव आहे. एक पाय मराठी हद्दींत व एक पाय गोमंतकाच्या हद्दींत ठेवून 'जयहिंद' अशी निर्जन जंगलांत आरोळी मारून सत्याग्रहाच्या नांवाखालीं महाराष्ट्रांत कित्येक वर्षें सुखानें दिवस काढणाऱ्या कांहीं जन्मजात बेकार माणसांनीं मुठभर बाटग्या किरिस्तांवांना हाताशी धरून गोव्यांत असंख्य चाळे चालविलेले आहेत. गोमंतवाणी त्यांना पुरून उरेल आणि यशस्वी होईल अशी शुभेच्छा व्यक्त करीत आहे. ●●●

अनुक्रमणिका

# आजवरीच्या निष्ठेचें सार्थक झाले

**प्रामाणिकपणाचें** आणि जाज्वल्य निष्ठांचें फळ 'याचि देहिं, याचि डोळां' माणसाला पाहायला भोगायला मिळतें; अशी एक शिकवण आहे. तिचें उत्कृष्ट प्रत्यंतर म्हणजे नटसम्राट बालगंधर्व आपल्या रसिकाला संतुष्ट करण्यासाठीं बालगंधर्वांनी आपली सर्व शक्ति पणाला लावली. जें जें केलें तें सारें रंगभूमीच्या उर्जितावस्थेसाठीं. जे रंगभूमीनें दिलें तें त्यांनीं तिची पूजा करण्यांत. एकनिष्ठेनें वेंचलें असा या गुणसंपन्न एकमेवद्वितीय नटाला गेल्या प्रजासत्ताकदिनी 'पद्म'भूषण' हा किताब देऊन भारत सरकारने त्यांचा गौरव केला. आणि त्या पुढच्याच सप्ताहांत मराठी नाटचपरिषदेतर्फे त्यांच्या अमृतमहोत्सवानिमित्त त्यांच्या 'नमूतो' असा भव्य सत्कार हि झाला.

हा सत्कार म्हणजे बालगंधर्वांच्या आयुष्यांतील एक फार मोठा पर्वकाल होता. रंगभूमीला वाहिलेल्या कोणाहि कलावंताचा असा सत्कार कधीं झाला नसेल 'नवी पिढी पारतंत्र्यांत जन्मली नाहीं म्हणून तिला भाग्यवान म्हणायचें; परंतु या पिढीला बालगंधर्वांच्य भूमिका पाहायला मिळाल्या नाहींत म्हणून ती अभागीहि आहे असें मात्र निश्चित पणें म्हणतां येईल" अशा तऱ्हेचे उद्‌गार महाराष्ट्राच्या मुख्य मंत्र्यांनी काढले. समाजकारणी, राजकारणी, उद्योगपती, सांस्कृतिक चळवळी करणारे अग्रणी, थोर सद्‌गृहस्थ, थोरथोर विदुषी यांनी या सत्कारांत आदरानें आणि उत्साहानें भाग घेतला आणि तो यशस्वी केला. सारेचजण नतमस्तक होते. जणूं या थोर कलावंतानें जें आम्हांला दिलें त्याचें अंशतः ऋण आपण फेडतों आहोंत अशी प्रत्येकाजवळ भावना होती. शिवाजीपार्क येथें जमलेला मेळावा ज्यांनी पाहिला ते धन्य होत, या सत्कारानें मराठी माणसाचा थोरपणाहि स्पष्ट झालेला आहे. मुंबई महापालिकेनें देखील आपली परंपरा मोडून पहिल्याच खेपेस बालगंधर्वांचा भव्य सत्कार येथील कमला नेहरु पार्कमध्यें घडवून आणला. बालगंधर्वांच्या आजवरीच्या निष्ठेचें सार्थक झालें असें कोण म्हणणार नाहीं?

• • •

# गेल्या वर्षीचे कलाकार व यंदाचे पद्मश्री !

**बालगंधर्वांच्या** बरोबरच महाराष्ट्रांतील सुप्रसिद्ध शिल्पकार वि. पां. करमरकर यांना 'पद्मश्री' हा किताब देण्यांत आला. महाराष्ट्रांतील चित्र–शिल्प विश्वाला अजून ही बातमी कळलेली नसावी. आपल्या ७२ वर्षांच्या आयुष्यांत शिल्पकार करमरकरांनी अजरामर कलाकृति निर्माण करून ठेवलेल्या आहेत. सिंहगडाभिमुख असलेला पुणें येथील शिवाजी महाराजांचा अश्वारूढ भव्य पुतळा आणि चौपाटीवरील विठ्ठलभाई पटेल हीं शिल्पें म्हणजे त्यांच्या हातून घडलेल्या व महाराष्ट्राला ललामभूत झालेल्या अतिभव्य कलाकृति होत. या शिवाय टाटानगर येथील जमशेटजी टाटा, सर कावसजी जहांगीर, पद्मश्री हर्डीकर, गुरुदेव रवींद्रनाथ टागोर, महात्मा गांधी अशीं व्यक्तित्त शिल्पें, व कांहीं अप्रतिम काल्पनिक मोडणीच्या शिल्पाकृतींची निर्मिति त्यांच्याकडून झालेली आहे. व्यावसायिक विभागांत तर राजे महाराजे व अन्य शौकिनांचे डझनांनी पुतळे त्यांच्या हातून तयार झालेले असतील.

### आयुष्यांतील चिंतनीय क्षण

करमरकरांचा गुणगौरव पाश्चात्य देशांतील नामवंत शिल्पकारांनी केलेला आहे. युरोप अमेरिकेची त्यांनी दोन वेळां वारी केलेली आहे. आणि अमेरिकेंतील शिल्पतज्ञांसमोर दोन तासांच्या आंत शिल्पाकृति बनवून त्यांना थक्कहि करून सोडलेलें आहे. त्यांच्या आयुष्यांतील लक्षांत राहण्यासारखी मोठी घटना म्हणजे आपली शिल्पाकृति बनविण्यासाठीं महात्मा गांधींनी त्यांना दिलेल्या बैठकी. गांधींची ही शिल्पाकृति सर्वोत्कृष्ट असल्याचा उत्तमोत्तम शिल्पकारांनी निर्वाळा दिलेला आहे.

गेल्या वर्षी त्यांना त्या वर्षाचे सर्वश्रेष्ठ कलाकार म्हणून बॉम्बे आर्ट सोसायटीनें मानचिन्ह दिलेलें होतें. यावर्षी भारत सरकारनें त्यांना 'पद्मश्री' पद देऊन गौरव केलेला आहे. दीपावली तर्फे त्यांचें या प्रसंगीं श्रद्धापूर्वक अभिनंदन करतों आणि त्यांच्या आयुष्यांतील भावी काल अत्यंत समाधानाचा जावो अशी प्रार्थना करतों.

• • •

## मराठी लेखकाला अभ्यासवृत्ती

रायटर्स सेंटर, मुंबई ह्या संस्थेच्या वतीने १९६४ साली एका मराठी लेखकाला अभ्यासवृत्ती देण्याचे ठरविण्यांत आले आहे हरि नारायण आपटे यांची शतसांवत्सरी ह्या वर्षी येत असल्यामुळें ह्या अभ्यासवृत्तीला 'हरि नारायण आपटे अभ्यासवृत्ती १९६४' असे नांव देण्यांत येत आहे. ही अभ्यासवृत्ती ललित (कादंबरी, कथा नाटक, कविता इत्यादि) स्वरूपाच्या वाङ्मयप्रकारांत मोलाची भर घालणाऱ्या ग्रंथलेखनासाठीं देण्यांत येईल. ही अभ्यासवृत्ती दरमहा पांचशे रुपयांची राहील व ती सहा महिनेपर्यंत देण्यांत येईल.

या अभ्यासवृत्तीविषयीं ज्यांना अधिक माहिती हवी असेल त्यांनी आपल्या अंगीकृत अथवा संकल्पीत कामाच्या माहितीसह, सेक्रेटरी, रायटर्स सेंटर, ३५ सी ताडदेव रोड, मुंबई ३४ यांच्याकडे पत्रव्यवहार करावा.



अनुक्रमणिका

# महाराष्ट्राचे अग्रेसर उद्योगपतीचा यथोचित गौरव

**महाराष्ट्राचे** सुप्रसिद्ध व सर्वपरिचित असे अग्रेसर उद्योगपति श्री. शंतनुराव किर्लोस्कर यांच्या षष्ठ्यब्दिपूर्तीनिमित्त गेल्या महिन्याच्या २ तारखेला त्यांचा भव्य सत्कार करण्यांत आला. या सत्कार प्रसंगी उद्योगक्षेत्रांत केलेल्या त्यांच्या उज्वल कार्याचा यथोचित गौरव करून सन्मानाने मानपत्र व ६१ हजारांची थैलीहि त्यांना अर्पण करण्यांत आली.

श्री. शंतनुराव किर्लोस्कर यांनी उद्योगक्षेत्रांत विशेषतः ऑईल इंजिन्स निर्मितिच्या बाबतीत जी कौतुकास्पद प्रगति केली ती तर आजच्या या क्षणाला विशेष उल्लेखनीय आहे. त्यांनी ही निर्मिति केवळ महाराष्ट्रासाठीं किंवा भारतासाठीं मर्यादित ठेवली नाही तर आंतरराष्ट्रीय पातळीवर त्यांची निर्यात करण्याचे ध्येय त्यांनी मोठ्या कुशलतेने साध्य केले व कमालीची लोकप्रियता संपादन केली. त्यांची ही यशस्वीता आज आंतरराष्ट्रीय कीर्तिची झाली असे म्हटल्यास वावगे होणार नाही. एका महाराष्ट्रीयन उद्योगपतिने केलेली ही प्रगति खरोखरीच अभिनंदनीय आहे.

त्यांचा हा सत्कार समारंभ खडकी येथील किर्लोस्कर ऑईल इंजिन्सच्या कारखान्यांत उभारण्यांत आलेल्या भव्य शामियान्यांत करण्यांत आला. या सत्कारास भारतांतलेच नव्हे तर परदेशांतीलहि प्रतिनिधी विशेषे करून हजर होते. अशा या महाराष्ट्रीय उद्योग श्रेष्ठीचा किंबहुना त्यांच्या उद्योगक्षेत्रांतील अपूर्व यशाचा, त्यांच्या षष्ठ्यब्दिपूर्तीनिमित्त कां होईना पण त्यांचा जाहीर सत्कार करून गौरव करण्यांत आला हे विशेष उल्लेखनीय आहे. अशा प्रकारचा उद्योगक्षेत्रांतील व्यक्तिचा वेगळ्या स्वरूपाचा सत्कार समारंभ घडवून समयोचितता साधण्यांत आली हेहि स्तुत्य.

श्री. शंतनुराव किर्लोस्कर यांना याप्रसंगी मिळालेली ६१ रुपयांची देणगी त्यांनी उद्योगधंद्यातील होतकरू लोकांना परदेशांत जाऊन उच्च शिक्षण घेतां येण्यासाठीं उभारलेल्या किर्लोस्कर फाऊंडेशनला दिली हे त्यांच्या मोठ्या मनाचे व उद्योग प्रगति विषयक कळकळीचे गमकच म्हणावे लागेल. श्री. शंतनुरावांना असेच यश मिळो व दीर्घायुरोग्य लाभो हीच आमची शुभेच्छा ! ●●●

## दीपावली बुद्धिबळ क्र. ४ चे विजेते

१ **सौ. मालती मधुकर नाईक,** C/o मधुकर रा. नाईक, सब ओव्हरसिअर, नलगंगा धरण योजना, नलगंगापूर, जि. बुलढाणा.

२ **जयराम बाबू गांधी,** महेश्वरी निवास, १ ला माळा, दत्तमंदिर रोड, मालाड (पूर्व). मुंबई ६४.

३ **सतीशकुमार लड्ढा,** C/o जी. आर. लड्ढा, लक्ष्मी निवास, बालाजी प्लॉट, अमरावती.

४ **सौ. नलिनीबाई गोडबोले,** S-1/12, South T. T. Nagar, भोपाळ (म. प्र.)

५ **दिनेश मोहन नाडकर्णी,** ६/१०, वनॉम हॉल लेन, गिरगांव, मुंबई-४.

विजय प्राप्त करणाऱ्या वरील पांच भाग्यवान विजेत्यांना एक वर्षासाठीं दीपावली मासिक भेट पाठविण्यांत येईल.

## डॉ. पु. ग. सहस्रबुद्धे शिष्यवृत्ति

महाराष्ट्रांतील एक विचारवंत, साहित्यिक टीकाकार, राजकीय व सामाजिक समीक्षक आणि तरुण पिढीचे वैचारिक मार्गदर्शक डॉ. पु. ग. सहस्रबुद्धे यांच्या षष्ठ्यब्दिपूर्तीनिमित्त एक शिष्यवृत्ती कायम स्वरूपांत पुणें विश्वविद्यालयांत ठेवायची योजना डॉ. पु. ग. सहस्रबुद्धे षष्ठ्यब्दिपूर्ती सत्कार समितितर्फे आखण्यांत आली असून समितितर्फे त्यांच्या प्रचंड विद्यार्थी वर्ग, चाहते, त्यांचे आदर बाळगणारे यांना मुक्तहस्ताने देणगी देण्याची विनंती करण्यांत आली आहे. देणगी स्वीकारण्याची व्यवस्था "वसंत" मासिक कार्यालय ८७, राजा राम मोहन रॉय मार्ग (चर्नी रोड) गिरगांव, मुंबई-४ येथें करण्यांत आली आहे.

## एका गोड माणसाचें अकालीं निधन

मुंबापुरींतील स्वनामधन्य कलावंतांना आपल्या गोड स्वभावानें आपलेसें करून घेणारे अतिशय प्रिय असे हरीन खोटे अकालीं कालवश झाले. आणि आपल्या रसिकप्रिय मधुर सहवासांच्या आठवणींचा सुगंध मागें ठेवून गेले. सबंध कलाजगत त्या दिवशीं हळहळलें. अश्राप माणसें देवाचीं लाडकीं असतात हें खरें असलें, तरी त्यांना अकालीं ओढून नेण्यांत नियतीचा कोणता हेतु असतो हें मात्र कळत नाहीं.

श्रीमती दुर्गाबाई खोटे यांच्यावर पुत्रशोकाचें दुर्धर संकट कोसळलेलें आहे. आणि विजयाबाईंच्या अपार दुःखाचें सांत्वन कसें करावें कळत नाहीं. आम्हीं त्यांच्या दुःखांत सहभागी आहोंत एवढयाच एका वाक्याशिवाय अशा दिङ्मुढ अवस्थेंत आणखी काय सांगणार ?

**संरक्षण करा अपुले-देशाचे**
**गुंतवारे गुंतवा पैसे पदरचे**







अनुक्रमणिका


सुरक्षिततेचे रखवालदार
देशरक्षणासाठीं सिद्द अस-
-लेला आमचा बहादुर जवान
आपल्या देशाच्या सरहद्दीवरील
काना-कोपरा सुरक्षित राखण्या-
-साठीं डोळ्यांत तेल घालून सतत
पहारा करीत आहे. देशाचे स्वा-
-तंत्र्य अबाधित राखण्यास तो
बद्धपरिकर आहे.
भारतीय रेल्वे सुद्धां आपल्या
देशाचा विकास आणि संरक्षण
सामर्थ्य वाढविण्यासाठीं सुरक्षित
व जलद वाहतुकीच्या सोयी पुर-
-विण्यास बद्धपरिकर आहेत.
मध्य रेल्वे




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास



अनुक्रमणिका

दीपावली बुद्धिबळ क्र. ५:

| | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | | | २ | ■ | ■ | ३ | | ४ |
| | ■ | ■ | ५ | ६ | | | ■ | |
| ७ | | ८ | ■ | | ■ | ■ | ■ | |
| | ■ | ९ | | ■ | १० | ११ | | |
| ■ | ■ | | ■ | ■ | ■ | | ■ | ■ |
| १२ | | | | ■ | १३ | | | १४ |
| | ■ | ■ | ■ | १५ | ■ | १६ | | |
| | ■ | १७ | | | १८ | ■ | ■ | |
| १९ | | | ■ | ■ | २० | | | |

"दीपावली बुद्धिबळाचे" नियम व अटी मला मान्य आहेत.

स्पर्धकाचें नांव ____________________

पूर्ण पत्ता : ____________________

## दीपावली बुद्धिबळ क्र. ५

येथें कापा

**आडवे शब्द—**

१ तोंडातोंडीं चालत आलेली गोष्ट
३ जोंधळ्याचीं वाळलेलीं ताटें
५ मैदान
७ पहिला ऋतु
९ अन्न
१० युरोपियन
१२ तलवार
१३ प्रवाह
१६ होडी
१७ सायकल
१९ बैलाच्या शिंगास बांधण्याची दोरी
२० शासनसत्ता

**उभे शब्द—**

१ साष्टांग नमस्कार
२ ढढाईची गोष्ट
३ सूक्ष्म अंश
४ अभिमान राखणारा
६ तंगडी
८ कच्ची हकिगत
११ एक चर्मवाद्य
१२ करंगळीच्या शेजारचें बोट
१४ मौल्यवान् रत्नें
१५ वहिणीचा मुलगा
१७ एक पातळ खनिज पदार्थ
१८ किसणीनें केलेला चुरा

**उत्तरें पाठवावयाची शेवटची तारीख**
**१५ मार्च १९६४**
**अधिकृत उत्तर-पुढील अंकांत**

**स्पर्धकांकरितां नियम व अटी—**

१. ह्री स्पर्धा निःशुल्क आहे.

२. ह्या स्पर्धेत कोणालाहि भाग घेता येईल.

३. स्पर्धेकरितां पाठविण्यांत येणारीं उत्तरें ह्याच पानावर छापलेल्या **चौकोनी कुपनांत** भरलेलीं असावीत. कूपनावर नांव व पत्ता लिहिणें आवश्यक आहे. **अन्यथा तीं विचारांत घेतलीं जाणार नाहींत.**

४. उत्तरें **'दीपावली बुद्धिबळ,'** संपादक, **'दीपावली,'** दलाल आर्ट स्टुडिओ, ४२ केनेडी ब्रीज, मुंबई-४ या पत्त्यावर पाठवावीत.

५. ह्या स्पर्धेकरितां आलेल्या अचूक उत्तरांतून ती **लॉट पद्धतीनें काढून** ज्यांचें उत्तर आमच्या उत्तराशीं बिनचूक असेल, अशा **पहिल्या पांच भाग्यवान विजेत्यांना** दीपावलीचे **वार्षिक वर्गणीदार** करण्यांत येईल व त्यांना वर्षभर दीपावली भेट म्हणून पाठविण्यांत येईल.

६. एकावेळीं एकाच स्पर्धकास फक्त एकच चौकोन पाठविता येईल.

७. स्पर्धेबावत संपादकांचा निर्णय अखेरचा मानला जाईल. त्याबावत कसलाहि **पत्रव्यवहार केला जाणार नाहीं.**

८. उत्तरें पाठवावयाची अंतिम तारीख १५ मार्च १९६४ ही आहे. नंतर येणाऱ्या उत्तरांचा विचार होणार नाहीं. उत्तर पुढील अंकांत प्रसिद्ध केलें जाईल.

## बुद्धिबळ क्र. ४ चें उत्तर

**आडवे शब्द**

**१ देवमाणूस, ४ कवळी, ५ अवतार, ७ लाटणें, ८ थपडाक, ९ राकट, ११ रगेल, १३ वनवास, १५ खोपट, १६ जामदार, १९ भाकीत, २० सावरकर,**

**उभे शब्द**

**२ मान्यता, ३ सण, ४ कमलाकर, ५ अप्सरा, ६ रथ, १० टवटवीत, १२ लष्कर, १४ सजा, १७ मदार, १८ वसा,**

**विजेत्यांची नांवे**
**पान ५६ वर पहा**






अनुक्रमणिका

